॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

श्रीगुलाबराव महाराजांनी निरूपण केलेला

# योगप्रभाव

## (खंड १)

पातंजल योगसूत्रें-समाधिपाद

द्वितीय आवृत्ति

चैत्र शु॥९
शके १८९०

मूल्य
पांच रुपये

संतश्रेष्ठ विभूति श्रीगुलाबराव महाराज.



तूं बाला ऐसे वर्तसी। परी बालबुद्धि नाही तुजपाशीं।
सर्वथा सर्वज्ञ होसी। ऐसे आम्हा दिसतसे ॥

# निवेदन

वऱ्हाडांतील अलौकिक संतविभूति श्रीगुलाबराव महाराज यांच्या रसाळ वाणींतून प्रगट झालेल्या "योगप्रभाव" ग्रंथाचें हें द्वितीय संस्करण होय.

प्रथम संस्करण तीन भागांत प्रसिद्ध झालें होतें. हें नवीन संस्करण फक्त दोन खंडातच प्रसिद्ध करण्याचें मंडळानें ठरविलें आहे. पैकीं पहिला खंड वाचकांची आग्रहपूर्वक विनंति लक्षांत घेऊन रामनवमीच्या शुभ मुहुर्तावर प्रसिद्ध होत आहे. या खंडांत समाधिपादांतील 'मैत्रीकरुणामुदितोपेक्षाणां' या सूत्रापर्यंत विवरण आलें आहे.

पुढील दुसरा खंड श्रीमहाराजांचे कृपाशीर्वादानें लवकरच प्रसिद्ध होईल असा भरंवसा बाळगून हें निवेदन संपवितो.

चैत्र शु।।९
शके १८९०

—ज्ञानेश्वर उद्धव मांढरे

सदस्य श्रीज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ
दहिसात, अमरावती.

।। श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ ।।

# योगप्रभाव परिचय

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ।।**

(गीता.)

नामसंकीर्तन वैष्णवाची जोडी ।
पापें अनंत कोडी गेली त्यांची ।। १ ।।
अनंतजन्माचे तप एक नाम ।
सर्व मार्ग सुगम हरिपाठ ।। २ ।।
योग याग क्रिया धर्माधर्म माया ।
गेले ते विलया हरिपाठी ।। ३ ।।
ज्ञानदेवी यज्ञ योग क्रिया धर्म ।
हरिविण नेम नाहीं दुजा ।। ४ ।।

( हरिपाठ— ज्ञाने. )

योगशास्त्राचा अतिम समाधि—असप्रज्ञात समाधि-साध्य होणें हाच खरा योगाचा प्रमाव होय. तो प्रभाव "ईश्वर प्रणिधानाच्या" साह्यावांचून केव्हांच दृष्टीस पडणें शक्य नाही, असें भगवान् पंतजली प्रभृति समस्त योग प्रवर्तकाचे व योगाचार्यांचें शिक्षावचन आहे. हें योगमार्गाचे कष्टमय फळ - असंप्रज्ञात समाधि-नुसत्या ईश्वर प्रणिधानानें- भगवन्नाम संकीर्तनानें - यमनियमादि अष्टांग- **योगाची अपेक्षा न बाळगतां,** सहज सुखमय कसें प्राप्त होतें हें या "**योगप्रभाव**" ग्रंथांत श्री गुलाबराव महाराजांनी फारच सोप्या,

रहस्यमय व तुलनात्मक शास्त्रीय पद्धतीनें योगभाष्य, वार्तिकादिकाची पूर्वपरपरा न सोडता नवीनप्रतिपादन शैलीनें सागितले आहे.

या ग्रथांत श्री महाराजांनी पातजल योगशास्त्राचा शिरोभाग जो ममाधिपाद, त्याचें नवीन प्रक्रियामय रहस्य प्रगट करून 'ईश्वर प्रणिधानाची' प्रक्रिया ठिकठिकाणीं अगदी स्वतंत्र व प्रामुख्याने वर्णन करतांना, खरोखरच 'रहस्यमय' उतरली आहे.

हे महाराजाचे प्रक्रियाप्राविण्य तात (श्री ज्ञानेश्वर महाराज), नाथ (एकनाथ), तुकारामादि अवतारी पुरुषांच्या तोडीचें आहे .

• • • • • • • • • • •

स्वकृत ग्रथाचे वर्गीकरण करताना हा ग्रथ महाराजानीं 'उद्धृत समयोपदेशात' ममाविष्ट केलेला आहे, व गुरुशिष्य सवाद-रूपाने लेखन करण्याची आज्ञा करून क्षणोक्षणी मूचना करून स्वत.च्या देखरेखेखाली लेखनकार्य पुरे करवून, पुन. ते तपासून घेऊन व मधून मधून प्रसगविशेषी सप्रदाय मंडळीत त्यामधील निरूपणे मागून, हा ग्रंथ तयार झाल्यामुळें त्याचें कर्तृत्व श्रीमहाराजाकडेच आहे यात मशय नाही . . . . . .

श्रीकृष्ण गोकुळीच्या मुखसहावसाचा आनंद श्रीमहाराजाच्या महवामात मी नुकनाच घेऊं लागलों आहे, इतक्यांत माझ्याच हाता ने योगप्रभाव ग्रथाला सुरुवात व्हावी, ही ईश्वरीकृपेची अघटित करणी होय. ही महाराजाची मधुर, प्रसादमय, रसाळ निरूपणे विशेषत माधान, काजळी व शुक्लेश्वर वाठोडा येथें झाली . . .

माधानचा प्रसंग माझ्या अत:करणावर कायमचा स्थायी झालेला आहे (तो प्रसंग असा)

माधानला हें निरूपण शिवमंदिरात बहुतकरून उत्तररात्रीं होत असे. योगसूत्राचें विवरण प्रथम सांगून नतर श्रीमहाराज भक्तांची रीती कथन करीत असत. योगक्रियेनें साध्य होणाऱ्या गोष्टी भक्तिमा-र्गांत भक्ताला नुसत्या निस्सीम भगवत्प्रेमामुळें किती सौलभ्याने मिळ-

तात हे मोठ्या मार्मिक रीतीनें सोदाहरण व सोपपत्तिक महाराज सिद्ध करीत . . भक्तांची रिती सिद्ध करण्याकरितां पूर्व संतांचीं वचनें जेव्हां महाराज प्रमाणार्थ बोलून दाखवित तेव्हां शिवमंदिराचा तो रम्य प्रदेश, प्रभातकालचा प्रशांत समय, मधुर शीतल वायु व श्रीमहाराजांची छंदोमय रसाळ वाणी, यांचे ऐक्य होऊन . . . . अभूतपूर्व आनंदाचें भरतें येत असे. व महाराजांच्या चरणकमलाची नित्य नूतन आवडी उत्पन्न होत असे.

योगप्रभाव जगापुढे येण्याचे खरेंखुरें श्रेय मात्र आमचे अमरावतीचे गुरुबंधु (कै.) श्री हरिभाऊ गणपत केवले यांचे कडेच आहे. कारण श्रीमहाराजांच्या वेगवती वाणीचा निरूपणकालचा वेग धारण करण्यास त्यांचीच लेखणी समर्थ झाली.मी केवळ बाह्यांगाचा-मजुरी कामाचा - भारवाहक झालों. अस्तु.

शके १८४६ गोकुळ अष्टमी
श्रीज्ञानेश्वर मंदीर, दहीसात, अमरावती

लेखक
**मिलिंद**

## प्रकाशकाचे दोन शब्द

योगप्रभाव ग्रंथाचा पहिला खंड (द्वितीय आवृत्ति) ाचकांना रामनवमीच्या शुभ मुहुर्तावर सादर करण्यांत ंडळाला अत्यंत आनंद होत आहे. श्रीमहाराजांचे जे ांहीं दुर्मिळ ग्रंथ आहेत त्यांतील हा एक होय. या ग्रंथाचा द्वतीय खंडहि प्रसिद्ध करण्यांत मंडळ प्रयत्नशील आहे.

नुसतीं आसनें व प्राणायाम करून त्याची सिद्धि ाप्त करून घेणें हें योगाचें खरें ऐश्वर्य नसून परमेश्वर-ाप्ति हें त्याचें अंतिम ध्येय आहे. याच दृष्टीनें श्रीमहा-ाजांनी या ग्रंथाला सार्थ असे "योगप्रभाव" (योगप्रभाव ्हणजे योगाचें ऐश्वर्य) नांव दिलें आहे.

परमेश्वरप्राप्ति, अष्टांगयोगाचे साह्य घेऊन वेदान्त-ानानें करून घेतां येतें किंवा परमेश्वराशीं प्रेमाचें नातें ावून त्यावर अनन्यप्रेम करून घेता येते.

पैकीं पहिला मार्ग अत्यंत कष्टदायक आहे असे ीता, भागवतादि ग्रंथांत सांगितलें आहे. कलियुगांत ुसऱ्या मार्गाचेंच श्रेष्ठत्व अनुभवी सत्पुरुषांनी ठरविलें ाहे व याची परंपरा गीतेंत 'विवस्वान्मनवे प्राह' त्यादि श्लोकांनी सांगितली आहे. याला 'अद्वैतभक्ति-ोग' म्हणतात. 'अभेदे जो भक्तियोग । तो सांगितला

षष्ठीं' असे श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्ञानेश्वरींतील दहाव्या अध्यायांत सांगतात.

याच्या प्रादुर्भावाचे चार काल श्रीगुलाबरावमहाराज यांनी सांगितले आहेत.

पहिला उपनिषत्काल– महाभारत, योगवासिष्ठ वगैरेचा-
यांत अद्वैत ज्ञान व तदंतर्गत भक्ति
होती.

दुसरा आचार्यांचा काल– या कालांत आचार्य ज्ञान व भक्ति
मानणारे होते; परंतु आचार्यांचे
टीकाकार आनंदगिरी व भामती-
कार वगैरे यांनी ज्ञानच वाढवून
भक्तीला फांटा दिला.

तिसरा काल– रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, निंबार्क
यांचा - यांनी द्वैतभक्तिच प्रतिपादन
केली. अद्वैतज्ञान प्रतिपादिलें नाहीं.

चवथा काल– श्रीज्ञानेश्वरमहाराज, तुकारामादि
संत यांचा-यांनी उपनिषत्कालीन
ज्ञान व भक्ति पूर्ववत् प्रतिपादन केली.

याच मताचा प्रसार श्रीगुलाबरावमहाराज यांनी आपल्या ग्रंथांतून केला; पण पूर्व आचार्यांनी जसें अद्वैत-ज्ञान शास्त्रीय पद्धतीनें मांडलें तशी भक्ति शास्त्रीय पद्धतीनें कोणत्याहि सत्पुरुषानें आजपर्यंत लोकांपुढें प्रसारित केली नाहीं. हें कार्य श्रीगुलाबरावमहाराजांनी केलें. हेंच त्यांच्या

ग्रंथांचे वैशिष्टय होय. व याकरितांच त्यांचा अवतार होता.

भक्ति म्हटली म्हणजे यांत्रिक पद्धतीनें पूजा, अर्चा भजन एवढाच अर्थ साधारण लोक करतात व त्याचा परिणामहि विशेष दिसत नाहीं. पण तीच पुढें भावनेंत परिणत झाली असतां त्याचे प्रत्यक्ष परिणाम प्रत्ययास येतात. या भावनांचे उद्दीपन संताच्या शब्दानेंच होतें म्हणूनच संतांच्या ग्रंथांचे भाविक अंतःकरणानें पठण व मनन करावे असा वरिष्ठांचा उपदेश असतो.

या ग्रंथांत श्रीमहाराजांनी भक्तीचें तत्त्व अलंकारिक पद्धतीनें सांगितलें असल्यामुळें हा ग्रंथ रसमय असा झाला आहे. त्याचें सेवन करून भाविक वाचकवर्ग पुष्ट होवो अशी परमेश्वरापाशीं मागणी मागून हा लेख संपवितो

—प्रकाशक

# सूत्रानुक्रमणिका

# विषयानुक्रमणिका

॥ श्रीज्ञानेश्वर माउली ॥

श्रीगुलाबराव महाराजांनी निरूपण केलेला

# योगप्रभाव

## पातंजल योगसूत्रें समाधिपाद

## उपोद्घात प्रकरण

सूत्र– " अथ योगानुशासनम् "

कोणी एक वैराग्यशील मुमुक्षु श्रीगुरूची प्रणिपात-पुरस्सर सेवा करीत असतां एके दिवशीं योगजिज्ञासेनें त्यांना परिप्रश्न करिता झाला. त्यावर श्रीगुरु मंगलाचरण-पूर्वक पातंजल योगसूत्राचें निरूपण करते झाले. तें येणें-प्रमाणें––

**मंगलाचरण**

नत्वा ज्ञानेश्वरं देवं सद्गुरुं करुणार्णवम् ॥
वक्ष्येऽहं बालबोधाय योगो महाराष्ट्रभाषया ॥ १ ॥



शुभ्रवर्ण, लखलखीत सुवर्णासारखा निर्विष, सहस्त्रमुख, तेजोमय ज्याच्या फणा पसरलेल्या असून ज्याच्या मस्तकावर पृथ्वी आहे, असा भगवान् शेष, चतुर्मुख ब्रह्मदेव, पंचमुख शंकर, यांचें ध्यान करा, व मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ वगैरे संतांस नमस्कार करा.

**परमात्मा शेष निर्विष**

श्रीपतंजल्याचार्याय नमः ।।

गुरु :— हा परमात्मा शेष निर्विष आहे. " अनंतश्चास्मि नागानाम् " म्हणजे मी नागांत अनंत आहे, असें भगवंतांनीं गीतेंत म्हटलें आहे.

शिष्य :- महाराज, "सर्पाणामस्मि वासुकिः" मी सर्पांत वासुकी आहें असेंही गीतेंत देवांनीं म्हटले आहे. येथें देवांनी नाग व सर्प अशा आपल्या दोन विभूति सांगितल्या आहेत. पण वृक्षांत कांहीं दोन विभूति सांगितल्या नाहीत, तशाच यक्षराक्षस, देवगंधर्व वगैरे यांच्यांतही दोन विभूति सांगितल्या नाहींत. अथवा मनुष्य, भूतें, विकार यांतही दोन विभूति नाहींत. पण सर्पांत दोन विभूति सांगितल्या आहेत ह्याचें कारण काय ?

गुरु :— गीतेंत सांगितल्याप्रमाणें सर्पांत नाग व सर्प असे दोन प्रकार आहेत. त्यांपैकीं नाग हे निर्विष असतात. व सर्प सविष असतात. भाष्यकारांनीं ' नागानाम् ' म्हणजे



'निर्विषाणां मध्ये' असाच अर्थ केला आहे, व श्रीधर, मधुसूदन वगैरे टीकाकारांनाही तोच अर्थ संमत आहे. सर्व नागांत शेष हा मुख्य असून परमात्म्यांनीं त्याला अनंत म्हटलें आहे.

शिष्य :– महाराज, अल्प विषयांतराची क्षमा करून सर्पांत आणखी कांहीं जाति असल्यास मला सांगाल काय ?

**दिव्यसर्पबाधेवर उपाय नाहीं**

गुरु :– सुश्रुत, भविष्योत्तर पुराण, भागवत वगैरे ग्रंथांत सर्पाच्या भौम आणि दिव्य अशा दोन जाती सांगितल्या आहेत. सुश्रुतकार म्हणतात कीं दिव्य सर्पाच्या विषबाधेवर उपाय नाहीं व या विषयांत त्यांचेंच मत अधिक प्रमाण मानलें पाहिजे. कारण ते धन्वंतरीचे शिष्य होते व धन्वंतरीनें मंत्रानें वगैरे सर्पविषचिकित्सा केली आहे.

**औषधापेक्षां मंत्र श्रेष्ठ**

सुश्रृतांत कल्पस्थानांत म्हटलें आहे कीं, औषधापेक्षां मंत्रच जास्त उपयोगीं पडतात. दिव्य नागांना व सर्पांना मनुष्याचा वेष धरिता येतो. पण भौम जातींना तसा धरितां येत असेल किंवा नाहीं हें माहीत नाहीं. परंतु ते विषाच्या योगानें मनुष्याच्या अंगांत येवून बोलतात व ज्ञानानें वस्तु वगैरे सांगतात, हें मात्र खरें. कालियादिकांनीं मनुष्याचा



वेष धरिला होता व श्रीकृष्णांची स्तुति केली होती असें पुराणावरून दिसतें.

### भौमसर्प प्रकार

वर जे भौम जातीचे सर्प सांगितले त्यांचेही तीन प्रकार आहेत. ते असे– दर्वीकर, मंडली व राजीमंत. दर्वीकर म्हणजे ज्यांना फणा असतात ते. मंडली म्हणजे ज्यांच्या अंगावर चट्ट-चट्ट असतात ते. आणि राजीमंत म्हणजे ज्यांचें अंग सोन्यासारखें झळकतें ते. यांच्या पासून प्रकरज, वैकरज, असे आणखी भेद झाले आहेत. ह्या सर्पांतही ब्राह्मण क्षत्रियादि जाति आहेत. त्यांचें निरूपण अनेक ग्रंथांत केलें आहे. दर्वीकर सर्प दिवसा फिरत असतात. व संध्याकाळपासून तीन प्रहर रात्रीपर्यंत मंडली फिरतात. राजीमंत हे चवथ्या प्रहरांत फिरतात. सर्पांचा अधिपति वासुकी आहे. आणि नागांचा शेष आहे. त्यालाच देवांनी अनंत असें म्हटलें आहे, हें वर सांगितलेच. अनंत शब्द ब्रह्मवाची आहे. ब्रह्माची उपासना शेष रूपानें होऊं शकते. म्हणून शेषालाहि अनंत (ब्रह्म) असेंच म्हटलें आहे. चित्रकेतु गंधर्वानें शेषाचीच उपासना करून पूर्णता संपादन केली अशी कथा भागवतांत आहे. तोच भगवान् शेष पतंजली रूपानें अवतीर्ण होऊन त्यांनीं जीवांच्या उद्धाराकरितां योगसूत्रें केलीं.



शिष्य :- भगवन्, सर्वजातीविषयक माझी जिज्ञासा तृप्त झाली. आतां योगसूत्र व्याख्यान आपल्या मुखानें श्रवण करण्यास मी आतुर झालों आहे.

**चित्त एकाग्र करण्याची आवश्यकता**

गुरु :- प्राणायामाला अगर डोळे दाबण्याला योग नाहीं म्हणत. 'युज्' धातु समाधीच्या अर्थी आहे. मनुष्य संसारी असो अगर परमार्थी असो त्याला चित्त एकाग्र करण्याची गरज असते. पोहणारे लोक, डोक्यावर पाण्याची घागर आणणाऱ्या बायका, यांना चित्त एकाग्रतेची गरज आहे. चित्त सत्व, रज व तम या तीन गुणांनी बनलें आहे. ज्ञान व सुख चित्तांत असलें म्हणजे तो सत्वगुण. चित्तांत चांचल्य व दुःख असलें म्हणजे रजोगुण, आळस आणि अज्ञान चित्तांत असलें म्हणजे तो तमोगुण. रज म्हणजे विषयाचे ठिकाणीं प्रीति असणें यालाच राग म्हणतात. आपणांस विषयाचे ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या सुखाची आवडी आहे म्हणून विषय आवडतात. रजोगुणांत चांचल्य व दुःख आहे व तमोगुणांत आळस आणि अज्ञान आहे. सत्व व तम या दोन गुणांत चित्त स्थिर असतें, व रजोगुणांत चंचल असतें. तमोगुणांत चित्त स्थिर असतें म्हणूनच साऱ्या दिवसाचा थकवा थोड्या झोपेंत (सुषुप्ति = अज्ञान) हरण होतो. झोपेनें तमोगुणामुळें जर थकवा दूर होतो तर ज्ञानानें व



भक्तीनें सत्वगुणामुळें सुख होऊन थकवा कां दूर होणार नाहीं ? घरदार सोडून वनांत गेल्याशिवाय योग होत नाहीं असें म्हणणें चुकीचें आहे. संसारांत राहूनही योग होऊं शकतो. दोन विरुद्ध-विरुद्ध वस्तु एकत्र मिळाल्या म्हणजे दोन्ही नाहींशा होतात. सत्वगुणांतलें ज्ञान व तमोगुणांतलें अज्ञान मिळविलें तर दोन्ही नाहीं राहणार. तमोगुणांतला आळस व रजोगुणांतलें चांचल्य मिळविलें तर कांहींच नाहीं. सत्वगुणांतलें सुख व रजोगुणांतले दु:ख मिळविलें तर कांहींच नाहीं. चित्त शुद्ध करण्याकरितां रजस्तमोगुण चित्तांतून काढून टाकावे व सत्वगुण वाढवावा.

**अथ योगानुशासनम् ।**

'अथ' हें मंगलवाचक आहे. चित्त हें एक चाक आहे. व आत्मा पृथ्वी आहे. चित्ताला गति दिली तर तें फिरत राहील. व गतीचा निरोध केला तर तें आत्मभूमींतच स्थिर राहील. हा योग प्रथम ब्रह्मदेवानें काढला; व भगवान पंतजलीनीं सूत्ररूपानें केला.

### चित्त शुद्धीचा उपाय

चित्तांतून रणोगुणाचें कार्य चंचलता व दु:ख आणि तमोगुणाचें कार्य आळस व अज्ञान हें काढून टाकावें व व सत्वगुणाचें कार्य ज्ञान आणि सुख वाढवावें म्हणजे चित्त



शुद्ध होत जातें. पण 'सुख वाढवावें' असे जें म्हटलें तें विषयजन्य मात्र नव्हे. (ता. ९-१०-१९०७)

भगवान् शेषाचें चिंतन करून व करावयास सांगून पुढें सांगतात :-

गुरु :- जो हा परमात्मा शेष त्यानें लक्ष्मणाचा अवतार धरून भक्तीचें स्थापन केलें, बलरामाचा अवतार धरून नीतीचें स्थापन केलें व पतंजलीचा अवतार धरून योगाचें स्थापन केंलें.

**चित्त तमोगुणांत परतंत्र व सत्वगुणांत स्वतंत्र**

वर सांगितलें कीं चित्त हें सत्व व तम या दोन गुणांत स्थिर होतें; परंतु तमोगुणांत तें परतंत्र होऊन स्थिर होतें, व सत्वगुणांत ज्ञानामुळें स्थिर होतें. उदाहरण-राजा हा स्वतंत्रपणें राहून संरक्षक व पहारेकरी हे त्याच्या ( राजाच्या ) आज्ञेंत असतात. परंतु कैदी हा परतंत्र असून संरक्षक व पहारेकरी यांच्या ताब्यांत असतो. त्याप्रमाणें चित्त तमोगुणांतून ( निद्रेंतून ) जागृतींत आलें म्हणजे जसें चंचलपणा सोडीत नाही तसे निद्रेंतही त्याचा चंचलपणा दबलेला असतो. परंतु तें सत्वगुणांत म्हणजे समाधींत जेव्हां जाते तेव्हां अगदीं निरिच्छ होतें. व त्याला कोठें जाण्याची इच्छाच नसते.



## चित्त एकाग्रतेंत सुख

चित्त एकाग्र झालें म्हणजे सुख प्राप्त होतें. विषय-भोगांत सुद्धां जें सुख होतें, तें विषय भोगतांना होत नाहीं, तर तृप्ति होऊन जेव्हां चित्त एकाग्र होतें तेव्हां सुख होतें. वीर्यपतनकालीं व भोजनान्तीं चित्त एकाग्र होतें म्हणून सुख होतें. विषयांचा जेव्हां भोगानें वीट येतो तेव्हां विषय नकोसा झाल्यामुळें तृप्ति होऊन सुख वाटतें. यावरून सुख हें विषयांत नाहीं तर निर्विषयस्थितींत सुख आहे. विषय भोगतां भोगतां त्यांतून चित्त परततें तेव्हां सुख होतें. तमो-गुणानें सुषुप्तींत म्हणजे निद्रेंत जर चित्त स्थिर झाल्यामुळें सुख वाटतें तर सत्वगुणानें तें आनंदांत स्थिर झालें असतां सुख कां होऊं नये ? अवश्य झालेंच पाहिजे.

## चित्ताच्या पांच पायऱ्या

चित्ताच्या एकदंर पांच पायऱ्या ( भूमिका ) आहेत. त्यांतून कोणातरी एका पायरीवर तें असतें. त्या पांच पायऱ्या ह्या–मूढ, क्षिप्त, विक्षिप्त, ( पुष्कळ वेळ चंचळ व कधीं स्थिर ) एकाग्र व निरुद्ध ( ब्रह्मरूप होणें. ) पाषाणांत, वृक्षांत चित्त आहे व आत्माही आहे. वृक्ष वाईट धुरीनें वाळतात. हिरा ढेंकणाच्या रक्तानें फुटतो. ज्या पदार्थाला नाश आहे त्याला दुःख वाटलें पाहिजे. दुःख वाटल्याशिवाय शक्ति कमी होत नाहीं. व शक्ति कमी

झाली म्हणजे अर्थातच नाश होतो. पाषाण व वृक्ष यांचे चित्त तमोगुणानें सर्वदा मूढ राहतें. मनुष्याचेंही चित्त निद्रेंत मूढ असतें.

पशुपक्षांचें चित्त **क्षिप्तदशेंत** आहे. क्षिप्त म्हणजे झेपा घालणें, येरझारा करणें. **मनुष्याचेंही** चित्त विषय-भोगकालीं क्षिप्तच असतें. मूढ व क्षिप्त दशेंत योगाचा गंधही नसतो. तेथें चित्ताचा निरोध मुळींच नसतो.

**विक्षिप्त चित्त** देव, राक्षस, भूतें यांचे आहे. कारण यांचें चित्त कांहीं स्थिर व कांहीं चंचल असतें. त्यांना भोगाची इच्छा असते. परंतु भोगाकरितां ते मनुष्याप्रमाणें वेळ घोटीत नाहींत. मनुष्याचेंही चित्त विक्षिप्त असतें पण स्वप्नाच्या व स्वप्नाच्या वरच्या स्थितींत विक्षिप्त असतें. याला इंग्रजींत Clairvoyance 'क्लेअरव्हायन्स' म्हणतात. परंतु हें योगाचें लक्षण नव्हे. कारण चित्त ताब्यात नसतें.

**एकाग्र चित्त** ऋषींचें असतें. कारण ते ध्यान करीत असतात. मनुष्येंही जेव्हां सत्वगुण वाढवून ध्यान करितात तेव्हां त्यांचें चित्त एकाग्र होतें. यावरून आपणाला असें दिसून येईल कीं, ब्रह्मांडातल्या सर्वांच्या चित्ताशीं मनुष्याचा संबंध आहे. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

"पार्था उर्ध्वींचिया ब्रह्मादि । मनुष्यत्वचि होय आदी ।।
म्हणोनि इयें अधीं । म्हणितलीं मूळें ।।" ज्ञा. १५–२०७



मात्र **निरुद्धचित्त** समाधिशिवाय कोणालाच प्राप्त होत नाहीं. एकाग्रतेंतून चित्त जेव्हां उठत नाहीं तेव्हां त्याला **संप्रज्ञात समाधि** म्हणतात. व चित्त निरुद्ध होणें तोच **समाधि**. त्याला **असंप्रज्ञात समाधि** म्हणतात. वास्तविक योग म्हणजे निरुद्धभूमीवर चित्त नेणें.

(ता. १०-१०-१९०७)

**योगश्चित्तवृत्तिनिरोधः** ।।२।।

**तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्** ।।३।।

**प्रमाणविपर्यय विकल्पनिद्रास्मृतयः** ।।६।।

**(तत्र) प्रत्यक्षानुमानागमाः प्रमाणानि** ।।७।।

गुरु :— अशा प्रकारची समाधि प्राप्त होण्याकरितां भगवान् पतंजलींनी सूत्र वर्णन केलें आहे. त्याचे समाधिपाद, साधनपाद, विभूतिपाद, व कैवल्यपाद असे चार पाद आहेत. ज्यांचें चित्त स्वभावतः स्थिर आहे, एकाग्रभूमीच्या जवळ जवळ ज्याचें चित्त गेलें आहे, अशा मनुष्यानें समाधि पादावरून अभ्यास करावा. ज्याचें चित्त चंचल आहे त्याच्याकरितां साधनपाद आहे. योगापासून गौण सिद्धि – मुख्य नव्हेत – उत्पन्न होतात. त्यांचें वर्णन विभूतिपादांत आहे. मुख्य कैवल्यदर्शन – समाधि त्याचें वर्णन कैवल्यपादांत केलें आहे.



"आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते." (गी. ६–३)

योगादर आरूढ होण्याची म्हणजे चढण्याची इच्छा करणारानें यम, नियम, आसन, प्राणायामादि कर्में करावीं. हे यम नियमादि दृढ झाले – साधक त्यांवर थोडासा आरूढ झाला–म्हणजे तो योगाच्या पायरीवर चढला.

"योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते" (गी. ६–३)

तोच पुढें शमाच्या योगानें पुढें जातो. शम म्हणजे धारणा, ध्यान, समाधि.

शिष्य :– महाराज, प्रथम समाधिपाद ठेवण्याचें कारण काय ?

गुरु :– समाधिपाद प्रथम ठेवण्याचें कारण नुसतें मनच स्थिर केलें तरी कार्य होतें. व मन स्थिर करण्याचें हजारों उपाय समाधिपादांत सांगितले आहेत. विज्ञानभिक्षूनीं वेदान्त मिळवून 'योगसार' ग्रंथ केला. विज्ञानभिक्षु म्हणतात– पतंजली, व्यास वगैरे गुरूंस नमस्कार करून, योगसमुद्र मंथन करून वार्तिकांतला सार काढून योगसारसंग्रहांत स्थापन करितो. या संग्रहांत आत्यंतिक चित्तवृत्तिनिरोध म्हणजे योग सांगितला आहे. योग दोन प्रकारचा आहे. संप्रज्ञात व असंप्रज्ञात; संप्रज्ञात म्हणजे एकाग्र करणारा व असंप्रज्ञात म्हणजे ब्रह्मरूप करणारा.

**योग लक्षण**

योगाचें सामान्य लक्षण म्हणजे चित्तवृत्तीचा निरोध



करणें असें आहे. परंतु भलत्याच गोष्टीनें चित्तवृत्तीचा निरोध करण्याला योग म्हणत नाहींत. एखाद्या बायकोकडे चित्त लागलें म्हणजे तें एकाग्र होतें. पण त्याला योग नाहीं म्हणत. मोक्षार्थ चित्तवृत्तीचा निरोध होणें ह्यालाच योग म्हणतात. म्हणून वरील योगाच्या सामान्य लक्षणाची अतिव्याप्ति होत नाहीं. आतां आत्यंतिक शब्द कशाला ? तर प्रलयकालींही चित्तवृत्तीचा निरोध होतो त्यालाहि योग म्हणावा लागेल. तर तसें नाहीं. कारण दुसऱ्या कल्पांत जीव कर्मानुसार जन्म घेतात, म्हणून आत्यंतिक म्हटलें आहे.

## चित्ताच्या वृत्ती

शिष्य :- महाराज, चित्तवृत्ति कोणत्या ?

गुरु :- चिंतन, चिलीम ओढणें, पान खाणें वगैरे ह्या वृत्तींचा पृथक् पृथक् निरोध शक्य नाहीं. ह्या सर्व वृत्ति पांच वृत्तींत येतात. म्हणून पांच वृत्तींचा निरोध केला म्हणजे सर्व वृत्तींचा निरोध होतो. प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा व स्मृति ह्या त्या पांच वृत्ति होत. आपणाला ज्या रीतीनें ज्ञान होतें तें **प्रमाण**.

**तत्र प्रत्यक्षानुमानागमाः प्रमाणानि ॥७॥**

प्रमाण तीन प्रकारचें आहे. प्रत्यक्ष, अनुमान, व



शाब्द. चार्वाक, मीमांसक, वेदांती असे निरनिराळे शास्त्रकार अनेक प्रमाणें मानतात. मी स्वतः नऊ प्रमाणवादी आहें. तरीं वरील तीनच प्रमाणें मुख्य आहेत. इतर प्रमाणांचें खंडण सांगण्यांत अर्थ नाहीं, ते प्रमाणांच्या युक्तींत सांगेन. आतां **प्रत्यक्षादि प्रमाण** कशास म्हणावें तें सांगतों.

**कारिका**

> सामान्यतस्तु दृष्टादतीन्द्रियाणां प्रतीतिरनुमानात् ।
> तस्मादपि चासिद्धं परोक्षमाप्तागमात् सिद्धम् ॥ १ ॥

प्रत्यक्षप्रमाण म्हणजे इंद्रियांना जें यथार्थ ज्ञान होतें तें. दोरीवर सर्प दिसणें, हें जरी डोळ्यानें ज्ञान होतें तरी तें कांहीं यथार्थ ज्ञान नव्हे, भ्रम आहे. म्हणून तें प्रत्यक्ष नव्हे. पुस्तक डोळ्यानें दिसतें तें यथार्थ ज्ञान होय. म्हणून तें प्रत्यक्ष प्रमाण झालें. ईश्वराचें ज्ञान मात्र प्रमाणानें होत नाहीं. कारण प्रमाणांची गणना वृत्तींत केली आहे व ईश्वराला जें जगाचें ज्ञान होतें तें ईक्षणानें होतें. ईक्षण म्हणजे संकल्प. जवळच्या पदार्थाचें ज्ञान होण्याला प्रत्यक्षप्रमाण उपयोगीं पडतें. जवळचे पदार्थ म्हणजे इंद्रियांनीं ज्यांचें ज्ञान होतें असे पदार्थ. आपणांस रागाचें वगैरे ज्ञान इंद्रियांनीं होत नाहीं. म्हणून तें ज्ञान होण्याला प्रत्यक्षप्रमाण नको. तसेंच परमेश्वराचें ज्ञानही प्रमाणांत घ्यावयाचें नाहीं.

दूरच्या पदार्थाचें ज्ञान होण्यास अनुमान प्रमाण

उपयोगीं पडतें. जसें दूर धूर दिसला त्यावरून अग्नीचें ज्ञान होतें. मात्र धुक्याला जर आपण धूर समजूं तर अनुमान चुकेल. काजळ आहे तेथें दिवा आहे; हें **अनुमानप्रमाण** होय.

शिष्य :– महाराज, अनुमान कशास पाहिजे ?

गुरु :– असें म्हणणें चुकीचें आहे. एखादा मनुष्य बायकोच्या जवळ गेला नाहीं व तिला गर्भ तर राहिला. मग दुसरा कोणी गेला असें म्हणशील की नाहीं ? म्हणून अनुमान मानावें. मात्र तें अनुमान सरकें मानावें. अनुमानाची जी उलटी रोति तिला **हेत्वाभास** म्हणतात. Fallacy, Greek-Sophistry.

उदाहरण– 'धूर आहे तेथें अग्नि आहे' हें सरकें अनुमान झालें, परंतु 'अग्नि आहे तेथें धूर आहे' हें उलटें अनुमान झालें. लोखंडाचा तापविलेला गोळाही अग्नीसारखा दिसतो. तसेंच 'दिवा आहे तेथें काजळ असतेंच' हेंही उलटें अनुमान होय. उलटें अनुमान करणें मूर्खपणाचें आहे. एक मनुष्य मूर्ख होता, तो न्याय शिकला. पुढें त्याला नोकरी लागली. बायकोलाही भूषण वाटलें. त्याचा एक मित्र एके दिवशी घरीं आला. तेव्हां बायको म्हणाली 'ते नोकरीवर आहेत.' मित्र म्हणाला 'न्याय शिकला, नोकर आहे ! झाले इतकें तरी मूर्ख तो मूर्खच.' बायको म्हणाली 'असें कां म्हणतां ?' तो म्हणाला 'दाखवूं तुला याची प्रचीति ?' मग त्यानें बायकोच्या सहीचें एक पत्र त्याला पाठविलें कीं 'तुमची



बायको विधवा झाली, लौकर या.' हें पत्र पाहून तो रडूं लागला. लोक जमले. तो म्हणाला 'माझी बायको बिचारी विधवा झाली हो ! ती आतां शृंगार वगैरे कशी करील ? खुद्द तिच्या सहीचेंच पत्र आहे. काय बिचारीवर कठीण प्रसंग हा ?' तें ऐकून लोक हंसू लागले. ते म्हणाले अरे तूं जिवंत असतांना तुझी बायको विधवा कशी होईल ? तो म्हणाला 'वा ! मी असतां माझी माय, बहिणही नाहीं का विधवा झाली ? मग बिचाऱ्या बायकोची कथा काय ?' असो. यावरून उलटें अनुमान करूं नये. जवळच्या पदार्थांचें ज्ञान होण्याला प्रत्यक्षप्रमाण व दूरच्या पदार्थांचें ज्ञान होण्याला अनुमानप्रमाण उपयोगी पडतें.

आतां तिसरें **शाब्दप्रमाण.** वैदिक शब्द, गुरूचे शब्द व आप्ताचे शब्द हें शाब्दप्रमाण होय. आप्त म्हणजे खरें व हिताचें बोलणारे. प्लेगने ज्याचीं सर्व बायकापोरें संपलीं तो सुद्धां आतां मी कोणासाठी खोटें बोलूं असें म्हणतो, मग ज्यांनी इच्छेनें संसार सोडला ते कशाला खोटें बोलतील? खरें बोलणारे " ऋषी आर्य म्लेच्छानाम् " यांतून कोणीही असो ते सगळे आप्तच. त्यांचें वचन प्रमाण मानावें. धर्मव्याध हा म्लेच्छ होता. पांडवांनीं व कौशिक नांवाच्या ब्राह्मणानें त्यांचे वचन प्रमाण मानलें; हें शाब्दप्रमाण. असे प्रमाण वृत्तीचे तीन प्रकार सांगितले. आतां विपर्यय वृत्ती–



**विपर्ययो मिथ्याज्ञानमतद्रूपप्रतिष्ठम् ॥८॥**

**विपर्यय** म्हणजे भ्रम. जसें दोरावर सर्प, शिंपेवर चांदी असा भास होणें हें विपर्ययवृत्तीचें लक्षण होय.

**शब्दज्ञानानुपाती वस्तुशून्यो विकल्पः ॥९॥**

शिंपेवर चांदी असा भास होणें हें विपर्ययवृत्तीचें लक्षण होय.

विकल्पवृत्ती म्हणजे शब्द आहे पण अर्थ नाहीं. उदाहरण– सशाचें शिंग, वांझेचा मुलगा वगैरे.

**अभावप्रत्ययालंबनावृत्तिर्निद्रा ॥ १० ॥**

**निद्रावृत्ती** म्हणजे अभाव व प्रत्यय या दोन वृत्तींना धरून ठेवणारें प्रमाण. निद्रेंत सुखाचा प्रत्यय येतो व कांहीं न समजणें हा अभाव असतो.

**अनुभूत विषयासम्प्रमोषः स्मृतिः ॥११॥**

आतां **स्मृति** म्हणजे पूर्वी पाहिलेल्या अगर ऐकलेल्या वस्तूची आठवण. अशा ह्या पांच वृत्तींचा निरोध करावा. ह्या वृत्तींना उलटवून ब्रह्मांत मिळविणें म्हणजे निरोध करणें होय. हा निरोध वैराग्य व अभ्यास ह्यांच्या योगानें करतां येतो.

**कारिका**

सामान्यतस्तु दृष्टादतींद्रियाणां प्रतीतिरनुमानात् ।
तस्मादपि चासिद्धं परोक्षमाप्तागमात्सिद्धम् ॥



आगमात् = आगम म्हणजे शाब्द प्रमाण. मागें जीं प्रत्यक्षादि प्रमाणें सांगितलीं, त्यांचाच उपयोग वरील कारिकेंत सांगितला आहे. (ता. ११–१०–१९०७)

**वृत्तय: पंचतय्य: क्लिष्टाक्लिष्टा: ॥५॥**

**अभ्यास वैराग्याभ्यां तन्निरोध: ॥१२॥**

गुरु :– निरोध हा अभावरूप नाहीं हें काल सांगितलें. पांच वृत्तींत क्लिष्ट व अक्लिष्ट असे दोन भेद आहेत. क्लिष्ट म्हणजे क्लेश देणाऱ्या व क्लेश देत नाहींत त्या अक्लिष्ट. ह्या वृत्ति जर परमेश्वराकडे लावल्या तर त्या क्लेश न देणाऱ्या होतात. व विषयांकडे लावल्या तर क्लेश देणाऱ्या होतात. जसें पाणी अन्नांत टाकलें तर पोषण करतें व विषांत टाकलें तर प्राण घेतें. योगानें परमेश्वराकडे वृत्ती लावावयाच्या असतात पण शेवटीं त्या अक्लिष्ट वृत्तींचाही निरोध करावा लागतो. त्यांचा **निरोध केला नाहीं तर द्वैत उत्पन्न होतें.** अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें वृत्तींचा निरोध होतो. अभ्यास व वैराग्य प्रत्यक्षच केले पाहिजेत.

### वैराग्य चार प्रकारचें आहे

**यतमान वैराग्य**, म्हणजे विषयाकडून वृत्ति काढण्याचा यत्न करणें, **व्यतिरेक वैराग्य** म्हणजे इतकीं इंद्रियें जिकली व इतकीं जिकावयाचीं राहिलीं; कानानें निंदा ऐकावयाची



नाहीं हें साध्य झालें, परंतु रसना जिंकावयाची राहिली असें पक्कें समजणे हें व्यतिरेक वैराग्य.

**एकेंद्रिय वैराग्य** म्हणजे बाह्य विषय सर्वथा आवडावयाचे नाहींत, मनांत राहोत.

**दृष्टानुश्रविकविषयवितृष्णस्य वशीकारसंज्ञावैराग्यम् ।।१५।।**

**वशीकार वैराग्य**– विषयांचे ठिकाणीं सर्वथा प्रीति न राहणें अगर द्वेषही न राहणें विषयांचे ठिकाणीं उदास असून वृत्ती अगदीं स्थिर राहणें हें वशीकार वैराग्य होय. विषयांत दोष पाहिल्यानें हें चारही प्रकारचें वैराग्य हळु हळु होतें. इहलोकाच्या स्त्रीधनांत जसे दोष पहावयाचे तसेच स्वर्गाच्या भोगांतही दोष पहावे. ययाती राजा स्वर्गांतून पतन पावला. विषयभोग कोठेंहि असोत. कैलासांत, वैकुठांत कोठेंही असोत. जेथें विषयभोग आहेत तेथें दोष आहेत. विषयदोषदर्शन बंद पाडूं नये. विषयांत दोष पहाणें बंद पडलें कीं इंद्रियें लाडकी झालींच. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

"म्हणोनी इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें ।।
लाळावीं ना कौतुकें । आदिकरूनि ।। (ज्ञा. अ.३-२०२.)

इंद्रियांवर विश्वास ठेवल्यामुळें तीं इंद्रियें विषयांत नेतात. केव्हां केव्हां सौभरी ऋषीसारख्या तपोधनऋषीचें विषयदोषदर्शन बंद पडल्यामुळें इंद्रियांनीं त्यांना विषयांत गोवलें. च्यवन, नारद यांनीं लग्नाची इच्छा केली. च्यवनऋषीनें लग्न करून



अश्विनीकुमारांना दिव्य काया करून मागितली. नारदांनी लग्नाची इच्छा केल्यामुळें त्यांना स्वतःच नारदी व्हावें लागलें. व साठ संवत्सर मुलें झालीं विश्वामित्रांना मेनकेच्या मागें लागून कुत्रा व्हावें लागलें. पराशरांनीं नावेंत धीवराच्या मुलीशीं समागम केला. मोठमोठ्यांची ही स्थिति झाली तरी ते समर्थ होते.

तेजीयसां न दोषाय वन्हेःसर्वभुजो यथा ॥ भाग स्कं. १०–३०

ते तेजस्वी असल्यामुळें त्यांना दोष नाहीं. त्यांना शुद्ध नाहीं व अशुद्धही नाहीं तरी पण त्यांना फळ भोगावें लागलेंच.

## इंद्रियनिग्रह अभ्यास

आपल्यासारख्यांनीं इद्रियांवर कधींही विश्वास ठेवू नये. गृहस्थाश्रमांतही स्त्रीभोगाचा नियम ठेवावा. तरुणपणांत ऋतुकालींच गमन करावें, अपत्य झालें म्हणजे चार पांच महिन्यांनीं गमन करावें, त्यानंतर वय जास्त झालें म्हणजे फार दिवसांनीं व स्त्रीच्या इच्छेनेंच गमन करावें. याप्रमाणें हळू हळू विषय सोडून द्यावे. प्रपंच करून परमार्थ साधण्याची इच्छा ज्याला आहे त्यानें हा क्रम घ्यावा, परंतु नुसता परमार्थच करावयाचा असल्यास एकदम विषय सोडून द्यावे.

शिष्य :– महाराज !

" ब्रह्मचर्य परिसमाप्य गृही भवेत्। गृही भूत्वा वनी भवेत् वनी भूत्वा प्रव्रजेत् " (जाबालोपनिषत्)

ही श्रुति म्हणते की ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम व वानप्रस्थ असे तिन्ही आश्रम करून नंतर संन्यास घ्यावा, परंतु दुसरी श्रुति

" ब्रह्मचर्यादिव प्रव्रजेत् अन्यथा गृहाद्वा वनाद्वा यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत् ।"

ही म्हणते कीं, ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ, या तिहींपैकी कोणत्याही आश्रमांतून संन्यास घ्यावा, ह्या दोन श्रुतींचा मेळ कसा ?

गुरु- श्रुतींतला विरोध पंडितांनीं काढून टाकावा.

" यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत् "

या श्रुतीचा अर्थ असा आहे की, संसाराची इच्छा नसेल तर एकदम वैराग्य घ्यावें. मग भगवे कपडे नसोत पण मनांतून सगळे विषय सोडावेत.

भगवान् गीतेंत म्हणतात :-

" शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेग स युक्तः स सुखी नरः ॥ "

(गीता अ. ५-२३)

काम उत्पन्न झाला म्हणजे स्त्रीची उतावळी होते. क्रोध आला म्हणजे शत्रूस मारण्याची उतावळी होते. अशी



उतावळी होणें ह्या वेग होय. कामक्रोध नांवानीं सर्वच विकारांचें ग्रहण उपलक्षणानें झालें.

भगवान् म्हणतात– कामक्रोधादि विकारांचे हे वेग या लोकांतच देहपातापूर्वीं जो दाबून टाकतो तो सुखी व योगी होतो. 'सुखी' शब्दानें या लोकीं स्थिरता दाखविली व 'योगी' शब्दानें परलोकीं उत्तम गति दाखविली. आतांपासूनच कामक्रोधलोभ दाबण्याचा यत्न करून चित्तशुद्धि करून घ्यावी. म्हातारपणीं करूं म्हटल्यानें कांहींच व्हावयाचें नाहीं. एकनाथमहाराज म्हणतात–

" मनुष्यजन्मीं ब्रह्मज्ञान। पुढील जन्मीं मी साधीन ॥
म्हणे तो नागवला जाण । सोलीव अज्ञान त्यापाशीं ॥ "

वैराग्य थोडें थोडें संपादन करूं म्हणणें हें **कर्पटवैराग्य** होय. एखाद्याला अजीर्ण होऊन कर्पट ढेंकर येऊ लागले म्हणजे तो आज आपण थोडें जेऊ असें म्हणतो. परतु त्याची गणना मितभोजनांत करावयाची नाहीं. कारण अजीर्ण झाल्यामुळें त्यास जास्त जेवणच जात नाहीं. मितभोजन करणारास अजीर्ण कसें होईल ? आज अजीर्ण झालें म्हणून तो कमी जेवतो. पण उद्यां अजीर्ण गेलें कीं पुन्हां पूर्ववत् सपाटा आहेच. म्हणून इंद्रियांच्या ताब्यांत राहून थोडें थोडें वैराग्य संपादन करू म्हणणें हे कर्पटवैराग्य होय. याच जन्मांत इंद्रियांवर विश्वास ठेवू नये. भगवान् व्यास म्हणतात :–



"मात्रा स्वस्रा दुहित्रा वा न विविक्तासनो भवेत् ।
बलवान् इंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति ।।" भा. ९-१९

इंद्रियग्राम हें विद्वानासही मोह पाडतें. म्हणून आई, बहीण, अगर मुलगी असली तरी तिला एकांतांत घेऊन बसू नये. मग परस्त्री तर दूरच राहिली. हें व्यासांचें वचन भागवतांत आहे. जैमिनी हा व्यासांचा शिष्य होय. तो म्हणाला, इंद्रियग्राम कितीही बलवान् असो विद्वानाला कांहीं मोह पाडीत नाहीं. व्यासांनीं भागवत केल्यावर जेव्हां त्यांनीं जैमिनीला तें परीक्षा करावयास दिलें तेव्हांची ही गोष्ट आहे. जैमिनीनें आपलें एक भारत केलें होतें. तें व्यासभारताच्या विरुद्ध असल्यामुळें व्यासांना तें बुडवावयाचें होतें. त्याला ही संधि बरी आली. व्यास म्हणाले "आपण वरील वचनाबद्दल पण करूं व तूं हरलास तर भारत बुडविलें जाईल." असा पण केल्यानंतर एके दिवशीं जैमिनी आपल्या मठांत स्नानसंध्या करीत असतां भगवान् व्यास एका सुंदर स्त्रीचें रूप धरून आले. तें पाहून जैमिनी मोहित होऊन त्यांच्याजवळ येऊन आपणांस वश होण्याची खटपट करूं लागले. या वेळचें त्यांचें परस्पर भाषण मोठें मजेदार आहे. "किंवा ब्राह्मण इ. इ. " -जैमिनी कामवश झालेला पाहून व्यासांनीं आपलें रूप प्रगट केलें व म्हणाले "काय रे ! बुडीव आतां आपलें भारत." असें म्हणून त्याचें भारत बुडविलें पण किती झालें तरी आपला मुलगा होय म्हणून दयाळूपणानें



त्याला सदुपदेश करून इंद्रियांचा कधींही विश्वास धरूं नको म्हणून सांगितलें. त्या भारतापैकीं जैमिनी अश्वमेध मात्र कांहीं विरुद्ध नसल्यामुळें बुडविला नाहीं. यावरून इंद्रियांवर कोणत्याही कालीं विश्वास करूं नये.

(ता. १२–१०–१९०७)

**अपरवैराग्य व परवैराग्य**

**तत्परमपुरुष ख्यातेर्गुणवैतृष्ण्यम्** ॥१६॥

गुरु :– या लोकचे व परलोकचें विषयाची इच्छा न होणें हें वैराग्य होय. वैराग्याचे चार प्रकार मागें सांगितलें.

आतां वैराग्याचे दोन भेद सांगतो. विषयापासून मन काढून विषयाचे रहित मन करणें याला **अपर वैराग्य** म्हणतात. व सत्वाच्या योगानें रजतम नाहीसें करून शेवटीं सत्वगुणाचीही तृष्णा सोडून देणें त्याला **पर वैराग्य** म्हणतात.

अपरवैराग्य हें संपाद्य आहे. हें वैराग्य विषयदोष-दर्शनानें होते. विषयवितृष्ण होण्याला ज्याप्रमाणें विषयदोष-दर्शन साधन आहे, तसेंच सत्व गुण नाहींसा होण्याला म्हणजे गुणवैतृष्ण्य होण्याला "परमपुरुषख्यातेः" (पुरुष म्हणजे ब्रह्म, 'ख्यातेः' म्हणजे जाणल्यानें) आत्मा मनाहून रहित आहे व परमेश्वररूप आहे हें ज्ञान झालें पाहिजे.



पहिलें अपर वैराग्य विषयदोषदर्शनानें झालें पाहिजे. मग अभ्यास. अभ्यासानें चित्ताचा निरोध होतो व नंतर पर वैराग्यानें ब्रह्मांतून चित्त इकडे येत नाहीं. ब्रह्मसभेंत भगवान् हंसरूपानें सनत्कुमारांस सांगतात:–

"सत्वं रजस्तम इति गुणा बुद्धेर्न चात्मनः ॥
सत्वेनान्यतमौ हन्यात् सत्वं सत्वेन चैव हि ॥१॥"
(भाग स्क. ११–१३)

सत्व, रज व तम हे द्रव्य बुद्धीचे आहेत, आत्म्याचे नाहींत. म्हणून आपण सत्वानें 'अन्यतमौ' म्हणजे रज व तम यांचा नाश करावा व सत्वानें (सत्व=आत्मज्ञान) आत्मज्ञानानें सत्वही सोडून द्यावें. याजवर नाथांनीं सुंदर ओव्या केल्या आहेत.

सर्प चावला होय ज्यासी ॥ विष खादल्या उतार त्यासी ॥
तें विष खातां येरे दिवशीं ॥ आत्मघातासी वर्धक ॥३८॥
(ए. भा.)

नाथ म्हणतात सर्प चावला त्याला विष दिलें तर सर्प उतरतो. वैद्यशास्त्रांतही " विषस्य विषमौषधम् " असें सांगितलें आहे, पण सर्प चावला नाहीं व नुसतेंच विष खाल्लें तर मनुष्य वांचत नाहीं. तसें रजस्तम निवृत्त झाले असतां सत्त्व वाढतो; परंतु रजस्तम निवृत्त होण्यापुरताच सत्व गुण वाढलेला बरा. नाहींतर नाथ म्हणतात, "तोहि



बाधी निजनिवाडे" गुणांचा नियम गीतेंतही असाच सांगितला आहे.

" रजस्तमश्चाभिभूय सत्वं भवति भारत ।।
रजः सत्वं तमश्चैव तमः सत्वं रजस्तथा ।।"
(गीता १४-१०)

दोन गुण दबतात व एक गुण वाढतो. "तमस्त्वज्ञानज विद्धि" तम हा अज्ञानापासून उत्पन्न होतो. तम म्हणजे मोह. हा सर्व जिवांची बुद्धि कुंठित करतो. बुद्धि कुंठित झाली म्हणजे "प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत । आळस व निद्रा हीं येतात.

'भारत' या शब्दावरून देवांनीं सुचविले कीं तुझ्यामुळें भारत वंशाला जास्त शोभा आली आहे.

"रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।।
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ।।"
(गीता १४-७)

कौंतेय म्हणजे कुंतीच्या पुत्रा. हें संबोधन स्तुतिपर आहे. यांत तुझी आई ही चांगली आहे असें सुचविलें.

रज हा रागात्मक म्हणजे प्रीतीच्या रूपानें उत्पन्न होणारा आहे. तृष्णा म्हणजे हाव व संग म्हणजे जवळ ठेवणें. भोगाचे पदार्थ जवळ ठेवण्याची हाव यापासून रज उत्पन्न झाला आहे. रजोगुणानें खटपट करावीशी वाटते.



"तत्र सत्वं निर्मलत्वात् प्रकाशकमनामयम् ।।
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चामघ ।।"
(गीता १४-७)

सत्व उत्पन्न होतें तेव्हां मी सुखी आहें, मी ज्ञानी आहें, अशा अभिमानानें बंधन करितें. नीति असून अभिमान असणें तो सात्विक. परंतु नीति नसून नुसता अभिमानच असतो तो मात्र आसुर होय. हा फार भयंकर आहे.

भगवान म्हणतात :-

"न मां दृष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ।।
माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ।।१५।।
(गीता अ. ७)

अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।।१६।।
यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ।।१७।।"
(गीता १६)

या असुर लोकांचे देवांनीं पुष्कळ पोवाडे गाऊन शेवटीं

तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान् ।।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ।।१९।।
(गीता अ. १६)

म्हणजे अशा असुरांना मी असुरी योनींत टाकतों असें म्हटलें आहे. म्हणून **नीतीवांचून अभिमान असणें भयंकर आहे**. वरील विवेचनावरून सत्वगुण देखील बंधन



करितोच. म्हणून **गुणवैतृष्ण्य** म्हणजे सत्वगुणही नाहींसा झाला पाहिजे. याला उपाय

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ॥
स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥२६॥
(गीता अ. १४)

भगवान म्हणतात, माझी भक्ति करितां करितां सर्वदा माझ्याच ठिकाणीं म्हणजे ब्रह्मांत मिळण्याचीच ज्याची इच्छा असते तो ब्रह्मांत जाऊन मिळतो. किंवा "मां च यो व्यभिचारेण" म्हणजे "गोपीकांसी कामें" म्हणजे गोपिकांसारखी व्यभिचार भक्ति करून जे आपणास धन्य म्हणवितात, ते ब्रह्मसुख मिळवितात.

तुका म्हणे धन्य त्यांचा व्यभिचार ।
साधिलें अपार निज सुख ॥

याप्रमाणें काम, क्रोध, भय, यांपैकीं कोणत्याही वृत्तीनें कां होईना जो भगवंताच्या सगुण रूपाचें सेवन करितो त्याला **गुणवैतृष्ण्य** वैराग्य म्हणजे **परवैराग्य** उत्पन्न होतें. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात :-

अगा मी एक लाणीचे खागें । मज येवों कां भलतेनि मार्गें ।
भक्ति कां विषयविरागें । अथवा वैरें ॥ (ज्ञा. ९-४७०)

अपर वैराग्य पहिलें मिळविलें पाहिजे, मग अभ्यास केला पाहिजे. अभ्यास थोडा केला तरी हरकत नाहीं परंतु



अपर वैराग्य मात्र जास्त पाहिजे. अपर वैराग्य कमी व अभ्यास जास्त असा प्रकार मात्र नसावा. अपर वैराग्य व अभ्यास झाल्यानंतर पर वैराग्य उत्पन्न होतें. सत्वगुण परवैराग्यानें नाहींसा होतो. (ता. १३-१०-०७)

## अभ्यास

गुरु :- काल अभ्यास सांगण्याचें कबूल केले होतें. लोकांची प्रवृत्ति अशी असते की झाडाचें फळ आधी पाहावे व मग तोडून घ्यावें. आपण अगोदर आंब्याचे फळ झाडावर पाहातों व मग खुडीनें तोडून घेतों. योगाचें फल समाधि. अभ्यासानें हें समाधिरूप फळ मिळवून घ्यावें अशी शास्त्राची रीति आहे प्रथम फल सांगतात. वेदांताला मिळूनच योग आहे.

## समाधि

समाधि दोन प्रकारचा सांगितला. **संप्रज्ञात** व **असंप्रज्ञात**; ध्येय व ध्याता हे दोन्ही एक होणें याचें नांव समाधि. याचे प्रकार दोन- एक ध्येय व ध्याता एक झालों असें वाटणें-जसा आपला अहंकार दोन प्रकारचा. मी कृष्णराव असें वाटणें हा एक व न बोलतांही मनांत ती गोष्ट राहणे-अहंकार राहणे-हा दुसरा. या दोन प्रकारच्या अहंकारांत एकाचा प्रत्यय होत नाही व दुसरा विशेष



वाटतो. तसें ध्याता व ध्येय एकरूप झालो असें वाटतें तो एक प्रकार व दुसरा एकरूप तर होतो पण एक झालों ही आठवण राहत नाहीं तो. असे दोन समाधि आहेत. एकरूप झालों असें ज्यांत वाटतें तो संप्रज्ञात समाधि व ज्यांत सहज ब्रह्मसुखरूप असतें तो असंप्रज्ञात समाधि. यालाच सविकल्प व निर्विकल्प अशीं दुसरीं नांवें आहेत.

संप्रज्ञात समाधि चार प्रकारचा आहे.

**वितर्क विचारानंदास्मितारूपानुगमात् संप्रज्ञातः ॥१७॥**

वितर्क, विचार, आनंद, व अस्मिता. स्थूलध्येय व मी एक आहें असें वाटणें हा **वितर्क संप्रज्ञात समाधि.** योगी जेव्हां चतुर्भुज रूप ध्यानांत आणतात व एकरूप होतात तेव्हां त्यांचेंच चित्त वैकुंठांत जाऊन विष्णूशीं एकरूप होतें. परंतु ध्रुवादिक भक्तांनीं जेव्हां ध्यान केलें तेव्हां त्यांच्या भक्तीनें देवच स्वतः आले. याला उदाहरण मेघाचें पाणी. मेघ दोन प्रकारचें पाणी आणीत असतात. एक सामुद्र जल व दुसरें गांगजल. याची परीक्षा अशी आहे कीं भात शिजवून तो चांदीच्या पात्रांत पावसांत दोन तीन तास ठेवावा, भात खराब झाला तर तें पाणी सामुद्रजल व भात खराब झाला नाहीं तर तें गांगजल समजावें. चरक, सुश्रुत वगैरे वैद्यक ग्रंथांत गांग पाणी पिण्याला सांगितलें आहे. मेघानें (मेघाच्या योगानें) गंगेचें पाणी आपल्याजवळ येतें. परंतु तीर्थास जातांना आपण गंगेला जातों. त्याप्रमाणें



योगी विष्णूशीं (त्याच्या चतुर्भुज स्थूलाशीं) ऐक्य तेथें (वैकुंठास) जाऊन पावतात. योग्यांच्या म्हटल्यानें विष्णु आपल्या अधिकारापेक्षां जास्त काम करूं शकत नाहीं. कारण ईश्वरानें तें रूप सृष्टीकरितां धरिलेलें आहे. व भक्त ध्यान करितात तें परमेश्वरच विष्णु झाला असें वाटून ध्यान करितात. योगी विष्णूशींच ऐक्य पावतात. व भक्ताकरितां ईश्वरच विष्णूचें रूप घेऊन येतो त्यामुळें त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. योगी हा वितर्क सप्रज्ञात समाधीनें ऐक्य पावतो. योगाचा एक उत्तम सिद्धांत हा आहे कीं चित्त फार मोठें आहे असें विज्ञान भिक्षूंनीं सांगून ठेविलें आहे.

शिष्य :– महाराज, योगी वैकुंठांत येथून जातात म्हणजे काय? व भक्तांना विष्णु येथेंच येऊन दर्शन देतात म्हणजे काय ?

**परमेश्वराची दोन रूपें**

गुरु :– याचा अर्थ असा कीं भक्तांकरितां ईश्वरच विष्णुरूप धरून येतो.

दोहा– ब्रज तजि अनत न जाऊहूं येही मेरी टेक ।।
भूतलभार उतारहू करहूं रूप अनेक ।।

भगवान म्हणतात, मी भूमीचा भार दुसरी रूपें घेऊन उतरीन, परंतु व्रज कधीं सोडणार नाहीं.

भागवत महात्म्यांत भक्तीनें नारदांना विचारलें कीं

हरि निजधामास गेले तर आतां कसें होणार ? नारद म्हणाले, हरि निजधामास गेले असे मंदाधिकाऱ्यांना वाटतें.

" द्रौपदी च परित्राता येन कौरवकश्मलात्।।
पालिता गोपसुंदर्य: स कृष्ण: क्वापि नो गत: ।।
(भाग. मा. २–२)

भगवान् नारद म्हणतात, द्रौपदीचा पाठिराखा व गोपींचा प्रियकर कृष्ण कोठेंच गेला नाहीं. यावरून परमेश्वर दोन रूपें नेहमीं धरीत असतो. ज्याप्रमाणें एकाच मनुष्याला मुलगा पितारूपानें व मुलें (विद्यार्थी) शिक्षकरूपानें ओळखतात. शरीर एकच परंतु शाळेंत मुलांना तुम्ही मास्तर आहांत व घरीं मुलांस पिता आहांत. उद्यां जर तुमची बदली झाली तर मास्तर या नात्यानें झाली, पण बाप या नात्यानें कांहीं बदली झाली नाही. तसा परमेश्वर भक्तांकरितां व सृष्टि चालविण्याकरिता दोन रूपें घेतो. देवानें दुष्टाकरितां घेतलेला अवतार गेला. पण भक्तांचा ईश्वर कांहीं गेला नाहीं. त्याप्रमाणें शंकर हे तमोगुणी असून त्यांचे भक्त मोक्षास गेले. तमोगुणांचें ध्यान करून कोण मोक्षास जातो ? कोणी जात असेल तर मग आपणही निजून राहावें.

शिष्य :– शंकराच्या ध्यानानें अनेक भक्त मोक्षास गेले हें कसें ?



गुरु :– सृष्टीच्या संहाराकरितां शंकर हे तमोगुणी आहेत. पण भक्ताकरितां ईश्वरच शंकररूपानें येतो. महिम्नांत असा एक श्लोक आहे.

शिष्य :– महाराज, महिम्नाची गोष्ट कशी आहे ?

गुरु :– महिम्नाची गोष्ट अशी आहे– पुष्पदंत हा गंधर्व होता. त्यानें शिवनिर्माल्य ओलांडलें. त्या दोषामुळें स्वर्गांत उडण्याची त्याची गति कुंठित झाली. तेव्हां त्यानें शिवस्तुति करून पाप दूर केलें. असो.

श्लोक– स्मशानेष्वाक्रीडा स्मरहर पिशाचा सहचरा ।
श्चिता भस्मालेपो स्त्रगपि नृकरोटी परिकरः ॥
अमंगल्यं शीलं तव भवतु नामैवमखिलं ।
तथापि स्मर्तृणां वरद परमं मंगलमसि ॥

पुष्पदंत म्हणतात हे भगवन् ! सृष्टीकार्याकरितां तू अमंगल (तमोगुणी) असशील परंतु भक्तकार्याकरितां मात्र तू मंगलच आहेस. तसाच विष्णुही सृष्टिकार्याकरितां वैकुंठांत आहे. परतु ध्रुवाकरितां ईश्वरच विष्णुरूप होऊन आला. याकरिता योगी सृष्टिकार्य करणाऱ्या विष्णूचेंच ध्यान करितात. परंतु भक्त ईश्वरच विष्णू आहे अशा निश्चयानें ध्यान करतात. याचें कारण चित्त फार मोठे असून एकदम सर्व जाणण्याला समर्थ आहे, परंतु तमाचें आवरण पडल्यामुळें चित्त सर्व जाणू शकत नाही. जसा अग्नि भस्मात असला म्हणजे दाह करू शकत नाही, त्याप्रमाणे चित्ताचें आहे.



अभ्यासानें तमाचें आवरण निघालें म्हणजे चित्ताला पाहिजे तिकडे जातां येतें. त्या चित्तास वैकुंठकैलासादि जवळच आहेत. स्थूल पदार्थाशीं–ईश्वर असो अगर जीव असो एकपणा पावणें हा वितर्क–संप्रज्ञात समाधि होय.

सूक्ष्मवस्तूशीं चित्त एक होणें हा **विचारसंप्रज्ञात समाधि** होय. उदाहरण, फुलाच्या वासाशीं एकपणा पावणें हा विचारसंप्रज्ञात समाधि होय. व फुलाशीं एकपणा पावणें हा वितर्कसंप्रज्ञात समाधि होय. विराटाशीं एकपणा पावणें हा वितर्क संप्रज्ञात समाधि व बुद्धीशीं एकपणा पावणें हा विचार संप्रज्ञात समाधि.

रज तम निघून गेल्यावर सत्त्वाच्या आनंदाशींच एकपणा पावणें हा **आनंदसंप्रज्ञात समाधि; अस्मिता संप्रज्ञात समाधि** म्हणजे आनंद झाल्यावर मी ईश्वर आहें अशा अहंकाराशीं एक होणें. हा चार प्रकारचा संप्रज्ञातयोग सांगितला. यांत चित्त अगदीं एकाग्रदशेंत असतें;

**असंप्रज्ञात** म्हणजे मी ब्रह्म आहें हें ज्ञान सुद्धां नकोसें वाटतें व तो शुद्ध असतो; हा असंप्रज्ञात झाला म्हणजे योग पूर्ण झाला; या समाधीनें सर्व कर्मांचा नाश होतो; वेदांताचा समज असा आहे कीं ज्ञानानें संचित कर्म जळतें व पुढलें भोगावें लागत नाहीं. परंतु प्रारब्ध भोगलेंच पाहिजे. योगी म्हणतात समाधीनें मागें झालेलें (संचित) पुढलें [क्रियमाण] व प्रारब्ध हे तिन्ही जळतात. व योग्यांना



स्वेच्छेनें वाटेल तेव्हां समाधि घेतां येतो. विज्ञानभिक्षु म्हणतात ज्ञान झाल्यावरही असंप्रज्ञात समाधि करावा, त्यानें प्रारब्ध जिंकतां येतें व याला परवैराग्यच उपाय आहे. अभ्यासानें असंप्रज्ञात समाधि नाहीं मिळत. अपर वैराग्याचें फळ इंद्रियनिग्रह; अभ्यासाचें फळ संप्रज्ञात समाधि व परवैराग्याचें फल असंप्रज्ञात समाधि; असंप्रज्ञात समाधि योगानें होतो व भक्तीनेंही होतो; घेरंड मुनीच्या मताप्रमाणें नुसत्या भक्तीनेंही असंप्रज्ञात समाधि होतो; परंतु दोन्ही असले तर उत्तमच. (ता. १४-१०-६७)

**भवप्रत्ययो विदेहप्रकृतिलयानाम् ॥ १९ ॥**

गुरु :- आतां सूत्रकार अभ्यास सांगतात; अभ्यासांत दोन भेद आहेत; एक **भवप्रत्यय** व दुसरा **उपायप्रत्यय.** भवप्रत्यय म्हणजे संसारांत जन्म घेऊन अनुभव घ्यावयाचा. उपायप्रत्यय म्हणजे साधनाच्या योगानें अनुभव यावयाचा. कितीही मोठा असला तरी उपायप्रत्ययानेंच अनुभव येतो. **विदेह आणि प्रकृतिलयानें हा भवप्रत्यय येतो**. विदेह आणि प्रकृतिलय हे उपासकांना प्राप्त होतात. उपासनेंत सगळ्यांपेक्षां उंच अशीं हींच दोन फळें आहेत. देवतांची उपासना करणाऱ्यांना पुष्कळ फळें मिळतात. चित्त एकाग्र करणाऱ्याला इंद्रपदही मिळतें. ह्या देवता निरनिराळ्या आहेत. जसें इंद्रियांना चालविणाऱ्या देवता, भूतांना चालविणाऱ्या देवता,



बुद्धीला चालविणारी देवता, प्रकृति व सहावा पुरुष. स्थूल, सूक्ष्म, मन व कारण यांचे सहा भाग आहेत. **उपासक जेव्हां कोणत्याही लोकांत जाऊन फल भोगतो तेव्हां त्याला प्रकृतिलय म्हणतात**; तो ज्या ज्या लोकांत जातो त्या त्या लोकांतला स्थूल देह त्याला घ्यावा लागतो. वैकुंठांत सगळीं चतुर्भुज शरीरें आहेत, त्याप्रमाणेंच कैलास, ब्रह्मलोक, या लोकांतही त्या त्या लोकचीं शरीरें असतात, तीं त्या त्या उपासकाला तेथें गेल्यावर घ्यावीं लागतात. इंद्रियावर चित्त एकाग्र करून नुसत्या लिंगशरीरानें जे भोग प्राप्त होतात ते विदेहफल होय. आपल्या ह्या मांसमय स्थूल अवयवांना कांहीं इंद्रियें म्हणत नाहींत. तर इंद्रियांत विषय ग्रहण करण्याची जी शक्ति तें इंद्रिय होय. जसें कानांत ऐकण्याची, नाकांत वास घेण्याची जो शक्ति आहे तेंच कर्णेंद्रिय व घ्राणेंद्रिय होय. श्वासोच्छ्वासांत जी वायूला हालविणारी शक्ति तो **प्राण** होय. प्राण हा वास्तविक एकच आहे. एकच वायु स्थानभेदानें निरनिराळीं नांवें घेतो. **लिंग शरीर** हें मन = संशय, बुद्धि = निश्चय, पंच कर्मेंद्रियांच्या शक्ति, पंच ज्ञानेंद्रियांच्या शक्ति, व पांच प्राण हे सतरा मिळून झालें आहे.

शिष्य :– महाराज, पंचभूतें एकत्र झाल्याशिवाय भोग होत नाहीं, लिंगशरीर स्थूलशरीराचा आश्रय करील तरच भोग होईल, लिंगशरीर हें अपंचीकृत आहे, म्हणून



भोग त्याला होऊं शकत नाहीं, त्यांत पंचभूतें एकत्र होत नाहींत.

गुरु :– याचें समाधान असें– विषय दोन प्रकारचे असतात, एक स्वत: मधूनच स्वत:ला भोगतां येतात, व एक दुसऱ्याडून भोगतां येतात. उदाहरण– हें जाईचें फूल आहे, हा काळा रंग आहे; येथें जाईचा वास व काळा रंग दिसणें हे भोग दुसऱ्याकडून–बाहेरून-मिळाले. आतां आपण आपला डोळा दाबून धरला तर त्यांत निरनिराळे रंग दिसतात, नाकावर लक्ष लावलें तर निरनिराळे सुगंध येतात. हे भोग स्वत: मधूनच स्वत:ला मिळाले. हे भोग कारणांतूनच निर्माण होतात. आपलें मन एकाग्र करून विषय भोगतां येतात किंवा बाहेरचे विषय भोगतां येतात. एकाग्र अंत:करणानें जे भोग मिळतात त्याला स्थूल शरीर नको. आपलें मन जागृतींत स्त्रीवर गेलें तर ती स्त्री स्वप्नांत दिसते. तिला मनच निर्माण करितें. परंतु स्वप्नांत ती स्थूल रूपानें दिसेपर्यंत त्या स्त्रीचा गर्भ मनांत तयार होत असला पाहिजे. स्वप्नांत स्थूल रूपानें दिसण्याच्या पूर्वी ती आपल्यास मनांत दिसत नाहीं. पण ती तयार मनांतच झाली पाहिजे. ती कांहीं बाहेरून आली नाहीं खचित. यावरून मन कांहीं पदार्थ कारणांतून काढून निर्माण करितें व जागृतींतूनही निर्माण करिते. याप्रमाणें स्वप्नांत मन दोन तऱ्हेनें पदार्थ निर्माण करितें. एक कारणांतून काढून व दुसरें जागृतींतून. नदीला पूर



जसे दोन तऱ्हेनें येतात. एक नदीच्या प्रवाहाचा पूर. हा प्रवाह जमिनीच्या पोटांतून वाहात असतो व दुसरा मेघाच्या पाण्याचा पूर, हा बाहेरून येतो. तसें मनही दोन प्रकारानें जग तयार करतें, एक जागृतींतलें पाहून. व जागृतींत न पाहिलेलेही कांहीं पदार्थ स्वप्नांत दिसतात. ते पदार्थ मन ब्रह्मांतून निर्माण करितें. हे पदार्थ मनांत तयार होत असतांना काल लागतो व त्या स्थितींत ते आपणास दिसत नाहींत. वास्तविक आपलें चित्त फार मोठें आहे व त्याला सर्व कांहीं दिसतें परंतु अहंकारनिद्रा असल्यामुळें दिसत नाहीं. योग्यांना हें सगळें दिसतें. कारण त्यांना अहंकार-तम-नसतो. याप्रमाणें मन एकाग्र करून लिंग-शरीरानें भोग भोगणें याला विदेह म्हणतात.

लिंगशरीरानें भोग भोगतात तो दोन प्रकारचा—मलिन व शुद्ध. मलिनांत रज, तम व सत्व हे आहेत. (लिंगशरीरांत तीन गुण आहेत) सत्वात्मक जो भोग तो शुद्ध (प्रकृतिलय). विदेह व प्रकृतिलय भोगणारे मोक्षा-सारखें सुख भोगून संसारांत पुन्हां जन्म घेतात. तो भवप्रत्यय. त्यांनीं पुन: योग केल्यांस लवकर साधतो. हा भवप्रत्यययोग आपल्या उपयोगाचा नाहीं. भगवद्गीतेंत

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यतते च ततो भूय: संसिद्धौ कुरुनंदन ॥
पूर्वाभ्यासेन तेनैव ऱ्हियते ह्यवशोऽपि स: ॥

(गीता ६-४३-४४).



अशीं वचनें आहेत. तीं भवप्रत्यययोग्याविषयीं नाहींत तर तीं उपायप्रत्यययोग्याविषयीं आहेत.

**भवप्रत्यय कालगणना**

आतां भवप्रत्यय भोगणारे किती कालानें संसारांत येतात तें सांगतों. कृत, त्रेता, द्वापार व कली ह्या **चार युगांचीं साठ लक्ष वर्षें ७१ वेळ जातात तेव्हां एक मन्वंतर होतें**. इंद्रियांच्या देवतांची उपासना करणारे दहा मन्वंतर पर्यंत त्या त्या देवतांच्या स्वरूपानें राहून नंतर पुन्हां जन्मास येतात. निरनिराळ्या इद्रियांच्या देवता आहेत. जसें घ्राणाची अश्विनिकुमार, जिभेची वरुण, वाचेची अग्नि-पंचभूतांची म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ह्या सूक्ष्म भूतांची भक्ति करणारे त्या त्या देवतांच्या रूपानें शंभर मन्वंतरपर्यंत राहतात. जसें आकाश हें सर्वव्यापी आहे त्याप्रमाणें तेही आकाश वगैरे होऊन राहतात. समष्टि अंहकाराची उपासना करणारे एक हजार मन्वंतरपर्यंत राहतात. सगळ्या जगाचा जो एक अहकार तो समष्टि अंहकार होय. सर्व जगाची जी एक बुद्धि ती समष्टि बुद्धि. तिची उपासना करणारे दहा हजार मन्वंतरपर्यंत विगतज्वर सुख भोगत राहतात व अव्यक्तचिंतक म्हणजे भगवंताची माया प्रकृति तिचें ध्यान करणारे एक लक्ष मन्वंतरपर्यंत राहतात; परंतु ह्या सगळ्यांना खालीं यावेंच लागतें. हें सगळें जग



अज्ञानानें झालें आहे. जोंपर्यंत अज्ञान आहे तोंपर्यंत खालीं येणें चुकत नाहीं. परंतु अज्ञानच गेलें म्हणजे पुन्हा खालीं येत नाहीं.

**उपायप्रत्यय**

उपायप्रत्यययोग दोन प्रकारचा. सामान्य व विशेष मी प्रकृतीहून निराळा आहें असें ज्ञान होणें हा सामान्य उपाय व मी परमेश्वर आहें असें ज्ञान होणें हा विशेष; आणखी एक तिसरा भौतिक नांवाचा प्रकार आहे. स्थूळाची भावना करणें म्हणजे मी देह आहें, विष्णु आहें, शंकर आहें, अशी भावना होणें हें भौतिक. भौतिक, सांख्य व अत्याश्रमी हे उपायप्रत्यययोगांत भावनेचे तीन प्रकार आहेत. भौतिकांत भूतांवर चित्त एकाग्र करावयाचें असतें, तें वर सांगितलें. ही भावना नाश पावणारी आहे. दुसरी मी प्रकृतीहून निराळा आहें, ही सांख्यभावना, ही नाश पावणारी नाहीं; तिसरी मी परमेश्वर आहें ही अत्याश्रमी भावना. सांख्य व अत्याश्रमी हा भेद केवळ नाममात्र आहे. वास्तविक नाहीं. भक्तांची खुबी मात्र कांहीं निराळी असते. अक्षरयोग त्यांचा झालेला असतो. मी दास आहें ह्या भावनेनें त्यांचा देहाभिमान गेला. त्यामुळें त्यांची सांख्यभावना सहज होते. मी परमेश्वर आहें हा झाला अत्याश्रमी. भक्तांचा प्रारंभ अत्याश्रमीपासूनच आहें. यांत मी परमेश्वर आहें, असें



वाटून प्रेमानें ते त्याशीं एक होतात. तोच त्यांचा समाधि.
(ता. १५-१०-६७)

**श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम् ॥२०॥**

गुरु :– उपायप्रत्यययोगच आपल्या कामाचा आहे म्हणून तो अभ्यास सूत्रांत सांगतात. भवप्रत्यययोग हा जन्मास आल्याबरोबरच येतो. विदेह व प्रकृतिलय यांच्या योगानें भोग भोगून संसारांत आलेले जीव सोडून बाकीचे देव असोत किंवा मनुष्य असोत त्यांना जन्मास आल्याबरोबर योग होत नाहीं.

"तंत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥४३॥
(गीता ६–४३)

या गीतावचनाप्रमाणें दुसऱ्या जन्मांत त्यांना कांहीं तरी अभ्यास करावा लागतो. परंतु भवप्रत्यययोग्यांना सहज चित्तनिरोध होतो. आपल्यास उपायप्रत्ययअभ्यास केला पाहिजे. हा अभ्यास करण्याला श्रद्धा, वीर्य, स्मृति, समाधि व प्रज्ञा हे पांच गुण आंगीं पाहिजेत. प्रज्ञा म्हणजे बुद्धि नव्हे. **प्रज्ञा** म्हणजे कोणतीहा वस्तु जशीची तशी समजणें. तिचें यथार्थ स्वरूप समजणें. आपण जागे असतों तेव्हां बोंब मारली तरी पदार्थ उत्पन्न करितां येत



नाहींत. परंतु स्वप्नांत आपण कोणतेही पदार्थ उत्पन्न करितों. जागृतींत जें पदार्थाचें ज्ञान होतें तें एकाच्या अपेक्षेनें दुसरा पदार्थ अशा रीतीचें होतें. अंधार आहे म्हणून प्रकाश समजतो. काळा रंग पाहिला तर हा पांढऱ्याहून भिन्न आहे म्हणून काळा आहे असें ज्ञान होतें. यावरून जागृतींत पदार्थांचें यथार्थ स्वरूप समजत नाहीं. बाहेरचे रंग डोळ्यानें दिसतात, ते एकाच्या अपेक्षेनें दुसरा असे दिसतात. परंतु डोळे दाबले असतां जे रंग दिसतात, ते एकाच्या अपेक्षेनें दुसरा असे दिसत नाहींत. सगळे एकदम दिसतात. ती दृष्टीच तशी आहे. म्हणून यथार्थ स्वरूप समजणें हेंच प्रज्ञेचें लक्षण आहे.

स्थूल डोळ्यानें जसे जड पदार्थ दिसतात तशी ही प्रज्ञा चेतनाला जाणते. ही प्रज्ञा समाधीनंतरच्या स्थितींत उत्पन्न होते. व ती शुद्ध परब्रह्माला जाणते. तिला कोणी ऋतंभरा म्हणतात. ऋतंभरा म्हणजे सत्याचें पोषण करणारी. अभ्यास करण्याला श्रद्धा हा गुण प्रथम सांगितला आहे. **श्रद्धा** म्हणजे आपले हातून योग व्हावा ही अभिलाषा. ही श्रद्धा मातेप्रमाणें पालन करते, असे व्यास आपल्या भाष्यांत म्हणतात.

श्रद्धेमुळें पराक्रम उत्पन्न होतो. हाच दुसरा सांगितलेला **वीर्य** गुण होय. घरगुती अनेक कामांत मनुष्यांचें मन गढलेलें असतें, परंतु योगाची अभिलाषा (श्रद्धा) उत्पन्न झाली म्हणजे पुढें घरचें कांहींही होवो असा पराक्रम जास्त



येतो. योग करीत असतांही मन हें मनुष्याला अनेक कामांत ओढीत असतें. तुकाराममहाराज म्हणतात–

हागतांही खोडी । चळण मोडविते काडी ।।
असे अनावर गुण । आवरावे काय म्हूण ।।

अशावेळीं सार काय व असार काय असा विवेक हवा असतो. तो विवेक करण्याला श्रद्धेमुळें पराक्रम जास्त येतो. श्रद्धा ही याप्रमाणें विवेकाचें पोषण करणारी असल्यामुळें तिला व्यासांनीं मातेप्रमाणें पालन करणारी म्हटलें आहे.

विवेक करणाराचें विशेष लक्ष श्रद्धेमुळें दुसरीकडे जात नाहीं. अशा प्रकारचा विवेक करितां करितां त्याला स्मृति उत्पन्न होते. **स्मृति** म्हणजे आपण अभ्यास करीत आहोंत, ही आठवण. आठवण राहिल्यामुळें चित्त समाधान पावतें. समाधानानें भावना तीव्र होते.

**तीव्रसंवेगानामासन्नः** ।।२१।।

भावना तीव्र झाली म्हणजे प्रज्ञा उत्पन्न होते. भावना म्हणजे संवेग. संवेग म्हणजे काम करण्याची उतावळी.

**मृदुमध्याधिमात्रत्वात्ततोऽपि विशेषः** ।।२२।।

मनाच्या तीन प्रकारच्या भावना आहेत. मृदु, मध्य व तीव्र. मृदु भावना म्हणजे कल्पना, मध्यभावना म्हणजे स्वप्नासारखी कल्पना, तीव्र भावना म्हणजे तीच कल्पना प्रत्यक्ष होणें. तीव्र भावनेनें **समाधि** प्राप्त होतो. यांचेही



नऊ भेद आहेत. ते उद्यां सांगू (ता. १६-१०-१९०७)

गुरु :- रुईची कल्पना करा. रुईचें उदाहरण घेऊन वर सांगितलेल्या तीन संवेगांचें स्पष्टीकरण सांगतात. पांघरूण रुईचें सूत काढून करतात. रुईमध्यें हात घातला तर आरच्यापार जातो. परंतु कपड्यांत हात जात नाहीं. त्याच कपड्याचा कोडगा केला तर त्याचे योगानें हातालाच इजा होईल. पांघरुणांत हात घालण्याचा प्रयत्न केला व तो प्रयत्न जोराचा झाला तर कदाचित् कपडा फाटून त्यांत हात जाऊं शकेल. पण पांघरुणाच्या कोडग्यांत हात मुळींच शिरणार नाहीं. उलटी हातालाच इजा होईल. हीच गोष्ट मनाला लागू आहे. एकाच मनाचे मृदु, मध्य व तीव्र असे तीन संवेग आहेत. संवेग म्हणजे काम करण्याची उतावळी. मन मृदु असलें तर त्यांत विषय शिरण्याची संभव असतो. म्हणून मन एकाग्र करीत जावें. मध्य संवेगांत मन एकाग्र असतें. त्या स्थितींत जरी विषयाचा व मनाचा संयोग होतो तरी विषय मनांत एकाएकीं शिरत नाहींत. तीव्र संवेगी मनांत विषय मुळींच शिरूं शकत नाहींत. उलट विषयच नाश पावतात.

**विषयदोषदर्शन**

विषय नाश पावण्याला विषयदोषदर्शन हा उपाय आहे. ससार हा नेहमींचाच, (अनंत जन्मांचा) मनुष्याचा

शत्रु आहे. संसार चांगला नसणें म्हणजे संसारांत दरिद्र असणें, खाण्याची टंचाई असणें. बायको चांगली नसणें, मुलें मनाप्रमाणें वागणारीं नसणें, हा ईश्वराचा आपल्यावर उपकार आहे. संसार चांगला असणें, पैसा धन पुष्कळ मिळणें, लोकांत मान असणें हें पुण्याचें फळ समजतात. परंतु ते पुण्य नव्हे. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात,

"जेणें मी दुऱ्हावें पंडुसुता । तें पुण्य ऐसें म्हणतां ।
जीभ न तुटे काई ।।" (ज्ञा. ९–३१७)

ज्यांना विवेक नाहीं असे अविवेकी पुरुष योगी होऊं शकत नाहींत. हा संसार फार दु:खकारक आहे. ह्या संसारानें आपल्यास अनेक जन्मांत घातलें. मायबाप, बहिण वगैरे वैरी आहेत असें मानावें. जवळचें नातें असलें म्हणजे ते आपले हितच करणारे असतात असें नाहीं. आपण त्यांना आपलें मानून त्यांचें हित करण्याचा प्रयत्न करितो. परंतु दुसऱ्या जन्मीं आपण त्यांना सर्प होऊन कदाचित् डसूं. आपल्या येथें नांगर आहे व पेरणी करावयाची आहे, तर त्या नांगराला बैलच कामीं पडतात. आप्त नुस्ते बसून खातात.

शिष्य :– महाराज, आपले आप्त व आपण एकाच रक्ताचें आहोत. त्यांना वैरी कसें मानावें ?

गुरु :– आपल्या पोटांतले जंत त्यांच्याही पेक्षां जवळ असतात मग त्यांना जवळ घेऊन न निजतां आपण



काढून कां टाकतो ? तुकाराममहाराज म्हणतात–

"पोटीं जन्मती रोग । तरी का म्हणावे आप्तवर्ग ॥
तैसें शरीराचें नातें । तुका म्हणे सर्व आप्तें ॥१॥"

त्यांचेंही हित करणारे कांहीं तुम्ही नाहीं. कदाचित् जन्मांतरांत आपण वाघ वगैरे असून त्यांना पीडा केली असेल. तसेंच कुत्रीं, पाषाण, वृक्ष वगैरे योनींत जाऊन लोकांस आपण अनेक प्रकारची पीडा दिली असेल. म्हणून या संसारांत कोणी कोणाचा हितकारी नाहीं. एक परमात्माच सर्वांचा हितकारी आहे. वाईट संसारच विषयदोषदर्शनाला चांगला. भगवान म्हणतात,

"यस्यानुग्रमिच्छामि तस्य सर्वं हराम्यहम्" भाग. १०-८८-८

संसार हा आपला शत्रू असून विचित्र दुःख देणारा आहे. जोंपर्यंत मुलगा झाला नाहीं तोंपर्यंत कोणी रडत नाहीं. परंतु मेला म्हणजे रडतात. पूर्वीं जसा नव्हता तसा तो आतांही नाहीं म्हणून शोक होऊं नये. परंतु होतो. म्हणून संसार हा उत्पत्तिमात्र दुःखदायक आहे. हा मध्येंच भासत असतो, व मध्यें भासते तें खोटें असतें. भगवान् म्हणतात,

"अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥२८॥"

(गीता अ. २).



स्वप्न हें आधींही नसतें व नंतरही नसतें, मध्येंच भासतें; तसेंच मृगजल हें आधीं नाहीं व नंतरही नाहीं, मध्येंच भासतें; वास्तविक आधीं व नंतर नसतें म्हणून तें मध्येंही नाहीं.

"आदावंते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा" (मां. का. २-६)

जें पहिलें नाहीं व शेवटीं नाहीं तें वर्तमानकालींही नाहीं. त्याप्रमाणें संसार हा पूर्वींही नव्हता व पुढेंही राहणार नाहीं म्हणून खरोखर तो आतांही नाहीं. तो केवळ उत्पत्तिमात्र दुःखदायक आहे.

शिष्य :– महाराज, संसार हा मिथ्या असून दुःख देत आहे तो कां ?

गुरु :– आपणाला आत्मस्वरूपाचा विसर पडला म्हणून जगाची रहाटी संसार वाढविणारी असते. तुकाराम महाराज म्हणातात, 'जग चालिलें उफराटें' व 'आडरानें भरलें जग' म्हणून संतांचा मार्ग नेहमीं जगाच्या उलट असतो.

**उलटा मार्ग नीटरे**

उलटा मार्ग म्हणजे जगाच्या उलट आपलें ज्ञान पाहिजे. संसारशत्रूच्या उलट आपली दृष्टि पाहिजे. दृष्टी म्हणजे ज्ञान. दृग् धातु ज्ञानवाची आहे. आपलें वर्तन–वृत्ति-ही शत्रूच्या उलट पाहिजे. गीतेंतही म्हटलें आहे–



या निशा सर्व भूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ।।

(गीता २-६९)

शिष्य :- महाराज, कित्येक लोक याचा असा अर्थ करतात कीं, सर्व भूतांनां झोंप लागते तेथें म्हणजे रात्रीं संयमीयोगी जागतात.

**उत्तम संसार परमार्थास घातक**

गुरु :- असा अर्थ केला तर घुबड, भूत, पिशाच हेही रात्रीं जागतात त्यांनाही योगी म्हणावें लागेल. म्हणून सर्व भूतांनां रात्रीं झोंप लागते हा अर्थ येथें इष्ट नाहीं. याचा वास्तविक अर्थ असा आहे कीं, सर्वभूत (जग) कारणांत झोंप घेतात व योगी हे कारणांत जागतात. हेंच सोप्या शब्दांनीं सांगावयाचें तर असें कीं, सर्व जग आत्म-ज्ञानाची इच्छा सोडून संसारवासना वाढवीत असतात व शहाणा असतो तो ह्याच्या उलट आत्मज्ञान मिळविण्याची खटपट करीत असतो. म्हणून विषयदोषदर्शनाला वाईट-संसारच हिताचा आहे. ज्याचा संसार चांगला त्याचाच परमार्थ चांगला अशी लोकांची समजूत आहे; परंतु ती बरोबर नाहीं. संसार हा शत्रु आहे व शत्रु बेसावधच पाहिजे. संसारांत जितकीं छिद्रें सांपडतील तितकीं उत्तम. उत्तम पुरुषानें संसाराशीं विरोधच करीत राहावें. चांगला



संसार विषयदोषदर्शनास विघातक आहे. स्त्री मनाप्रमाणें वागणारी असली म्हणजे हाही तिचें मन सांभाळण्यास टपत असतो व शेवटीं ती सांगेल तसें वागूं लागतो. मग त्याची स्थिति "तुका म्हणे केला रांडेनें गाढव ॥" अशा प्रकारची होते. ज्यांचा संसार चांगला आहे त्याला तो सोडावासा वाटत नाहीं. त्याचें मन संसारांतून विटत नाहीं. असा मनुष्य म्हणेल संसार साधून मला परमार्थ सांगा. पण वाईट संसार असलेला मनुष्य म्हणेल, मला आतां परमार्थास लावा, ही संसाराची किटकिट नको. संतांनीं संसार चांगला म्हटला आहे, परंतु त्याचें तात्पर्य निराळें आहे. तुकाराम महाराज म्हणतात,

नलगे तयास जाणें वनांतरा ॥ सुखें येतो घरा नारायण ॥

एकनाथमहाराज म्हणतात,

मजमध्यें रंगली चित्तवृत्ती । यालागीं विसरला गृहासक्ती ॥
त्यासी गृहस्थाश्रमींच माझी प्राप्ती । निश्चयें जाण उद्धवा ॥

गृहासक्तिच सुटल्यावर तो कोठेंही राहिला तरी काय ? एकंदरींत सर्व संतांचें तात्पर्य संसार सोडण्यांतच आहे.

शिष्य :- महाराज, संसार सोडण्याकडेच आपला येवढा कटाक्ष कां ?

गुरु :- प्रपंच व परमार्थ हे एके ठिकाणीं राहूंच



शकत नाहींत. समर्थांच्या जुन्या दासबोधांत अशीच एक ओवी आहे,

जैसी लेखणी करावी ।। तैसी आंगोळी चिरावी ।।
ऐसी समबुद्धि व्हावी ।। तरी प्रपंचीं परमार्थ ।।

अशी समबुद्धि झाली तरच प्रपंच व परमार्थ एके ठिकाणीं राहूं शकतील. नाहींतर समर्थ म्हणतात कीं,

ज्यासी वाटे परमार्थ करावा । तेणें चालता मार्ग धरावा ।।

नाथही असेंच म्हणतात. परंतु संसार सोडण्याचें संतांचें तात्पर्य आहे तें कांहीं नुसतें रानांत जाऊन बसण्याकडे नाहीं. तर संसार मनानें सोडला पाहिजे. मनांतून समूळ विषय निघून जाण्याकरितां कांहीं काळ संसार करावाच लागतो. संसार एकदम सोडूं नये. आहार एकदम सोडला तर मरण येतें, म्हणून हळुहळू अन्न कमी केलें पाहिजे. दुष्काळांत उपासानें पीडलेल्या लोकांस जर पुष्कळ अन्न दिलें तर ते मरून जातात, अशीं उदाहरणें आहेत. त्यांना अन्न थोडें थोडेंच दिलें पाहिजे. तसेंच अन्न सोडावयाचें आहे तर हळुहळू कमी केलें पाहिजे. विषय जोंपर्यंत जवळ आहेत तोंपर्यंत हळुहळू कमी करण्याचा अभ्यास करावा. दुष्काळ पडला नाहीं तोंपर्यंत उपास सहन होण्याचा प्रयत्न करावा. दुष्काळांत एकदम सहन होणें नाहीं. विषय जोंपर्यंत जवळ आहेत तोपर्यंत ठीक आहे. संसारी लोक विषय वाढवितात व मग म्हातारपणीं मरून जातात. विषय जोंपर्यंत ताब्यांत आहेत तोंपर्यंतच कमी केले पाहिजेत.



ज्याचा आहार तितकाच आहे त्यानें मितभोजनाचा नेम करावा. आपण विषय सोडले नाहींत तर विषयच आपणाला सोडणार व शेवटीं इंद्रियेंही सोडून जातात. म्हणून जोंपर्यंत शक्ति आहे तोंपर्यंत विषय ताब्यांत असले तरी ते सोडून देणें बरें. देवानें गृहस्थाश्रम जो दिला आहे तो विषय कमी करण्याकरितांच दिला आहे. पुढें म्हातारपणीं विषय आपोआपच कमी होतात. परंतु जसजसे विषय कमी होतात तसतसा उपद्व्याप मात्र वाढत जातो. कारण विषयांची वासना कांहीं वैराग्यानें कमी झालेली नसते. वासना तशीच राहून विषय भोगण्याची शक्ति मात्र कमी होते, व ती शक्ति अन्य तऱ्हेनें भरून काढण्याची याची धडपड चालूच असते. म्हणून उपव्द्याप वाढतो. विडा तर खावासा वाटतो व दांत तर पडलेले असतात म्हणून आणा खलबत्ता व बसा विडा कुटत, असे उपव्द्याप वाढतात. म्हणून पहिलेपासूनच विषय हळु हळू सोडत सोडत खाणें, पिणें, धन मिळविणें, म्हातारपणीं पुत्र पोषण करील ही इच्छा, वगैरे हळु हळू कमी करीत विषयांतून वासना फिरेल असा यत्न करीत राहावें. याप्रमाणें विषयांतून वासना निघाली म्हणजे विषय नाश पावले तरी त्यांपासून दुःख होणार नाहीं.

शिष्य :– महाराज, समाधींत चित्त एकाग्र झाल्यामुळें जर विषय सुटतात तर निद्रेंतही चित्त एकाग्र होतें,



मग नेहमीं झोंपच घेत राहावें म्हणजे विषय आपोआप सुटतील !

गुरु :- वा ! निद्रेंत वासना दबली असते ती जागेपणीं पुन्हां नवी होते व समाधींत जेव्हां चित्त जातें तेव्हां तें अगदीं निरिच्छ होतें. मग त्याला विषय आवडे-नासे होतात. हें निरूपण मागें झालेंच आहे. (पान ५ पहा) निद्रेंत चित्त निरिच्छ होत नाहीं. कारण निद्रा ही तमोगुणाचें कार्य आहे. त्यांत वैराग्य होत नाहीं. रोग्याला साखर गोड लागत नाहीं, म्हणून तें कांहीं वैराग्य नव्हे. **रागाच्या आवेशांत कोणी दु:ख मानीत नाहींत म्हणून ते वैराग्यशील नव्हत,** आळशी होत. तामस पुरुषाला परमात्म-प्राप्ती होत नाहीं.

## तीव्र संवेगानें समाधि

विषयाकडे आपला तीव्र संवेग असतो, परमेश्वराकडे संवेगच नाहीं. म्हणून विषयाकडला तीव्र संवेग कमी करून परमेश्वराकडे वाढवावयाचा हें आपलें मुख्य काम आहे.

ह्या मृदु व तीव्र संवेगालाच भक्ति मार्गांत द्रवत्व व कठिणत्व असें नांव आहे. द्रवत्व म्हणजे पातळपणा. चित्त हें पातळ होण्यास म्हणजे त्यांत प्रेम येण्यास पुष्कळ अनुताप असावा लागतो, ज्याप्रमाणें सोन्याला पुष्कळ उष्णता दिली म्हणजे तें द्रवतें-त्याचा रस होतो-त्याप्रमाणें



आपल्या चित्तांत प्रेमाचे पाझर सुटण्यास त्याला अनुताप तीव्र झाला पाहिजे. भक्तिमार्गांत द्रवत्व म्हणजेच तीव्र संवेग. चित्त जेव्हां विषयाकडे न जातां भगवंताच्या कथा गाण्यांत व ऐकण्यांतच प्रेमानें रंगून जातें तेव्हां तीव्र संवेग झाला असें म्हणावें. मघुसूदन सरस्वति म्हणतात:-

" काठिण्यं विषये कुर्यात् द्रवत्वं भगवत्पदे ॥ "

मृदु संवेग म्हणजे कठिणत्व, हें विषयाकडे पाहिजे व द्रवत्व म्हणजे तीव्र संवेग हा भगवंताकडे पाहिजे. व्यवहारांतही काटयाचीं झाडें उपटून टाकण्यांत आपणास आनंद वाटतो; व फुलाचें झाड लाविलें म्हणजे आनंद वाटतो; म्हणून भगवंताचे ठिकाणीं आवडी वाढली म्हणजे अंतःकरणांतून विषय नाश पावतात.

"ध्यानीं ध्यातां पंढरीराया ॥ मनासहित पालटे काया ॥"

(तुका. गा. )

खरोखर पाहतां विषय नाश पावले तर आनंद मानावा; परंतु लोक तसें करीत नाहींत. जगाची रीत उलटी आहे. ते परमेश्वराकडे मृदु संवेग करितात व विषयांकडे तीव्र संवेग करितात. मुलगा जसजसा वाढतो तसतसें त्याच्या आयुष्यांतलें एक एक वर्ष कमी होतें, परंतु त्याचा आनंद मानून वाढ दिवस करितात. ज्याचें आयुष्य थोडें राहिलें असतें व बल व बुद्धि क्षीण होतात त्याला



वडील समजतात. ज्याला पुष्कळ विषयविलास मिळतात त्याला सुखी समजतात. म्हणून,

"देव होईजेत देवाचे संगतीं। पतन पंगतीं जगाचिया।"

जगाच्या पंक्तींत बसून देवास न मुकतां, जो तीव्र संवेगी असतो त्याला भक्तिमार्गांत प्रेमानें समाधि लवकर होतो. ईश्वराचे ठिकाणीं द्रवत्व असणारास भगवंताच्या कथा व त्याचे गुणानुवाद ऐकल्याबरोबर प्रेमाचा पाझर सुटतो व त्या प्रेमामुळेंच त्याला समाधि प्राप्त होतो, असें घेरण्ड मुनि म्हणतात. योगानेंही हा समाधि प्राप्त होतो. वर जे मृदु, मध्य व तीव्र संवेग सांगितले त्यांचे पुन्हां तीन तीन भेद आहेत. जसे मृदुमृदु, मृदुमध्य, मृदुतीव्र वगैरे.

(ता. १७-१०-०७)

श्रीज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु.



# ईश्वर प्रकरण

## ईश्वर प्रणिधानाद्वा ॥ २३ ॥

**प्रणिधान म्हणजे प्रेमलक्षणा भक्ति**

गुरू :– तीव्र संवेगी मनुष्याला समाधि लवकर साधतो. व निरोध (चित्ताचा) करण्याचे अनेक उपाय समाधिपादांत सांगितले आहेत. हें निरूपण मागें झालें. आता "ईश्वरप्रणिधानानें" तीव्र संवेग नसला तरी समाधि साधतां येतो असें सांगतात. 'वा' हे व्याकरणांत विकल्पार्थी आहे. समाधिपादांत पूर्वीं तीव्र संवेगानें योग साधतो असें सांगितलें. आतां ईश्वर प्रणिधानानेंही कार्य होतें असें सांगतात. हें सूत्र योगशास्त्रांत फार महत्वाचें आहे. कारण यांत भक्तीचा स्वीकार केला आहे. भाष्यकार 'प्रणिधानात्' याचा अर्थ 'भक्तिविशेषात्' असा करतात, व वार्तिककार भक्तिविशेष म्हणजे प्रेमलक्षणा भक्ति असा अर्थ करतात.

शिष्य :– महाराज, साधनपादांतही एक ईश्वरप्रणिधान सांगितलें आहे. त्याचा अर्थ काय करावयाचा ?

गुरु :– त्याचा अर्थ ईश्वराची पूजा, अर्चा नियम वगैरे असा करावा, व येथें ईश्वरप्राणिधानाचा अर्थ प्रेमलक्षणा भक्ति असा घ्यावा. भक्ति दोन प्रकारची– गौणी



आणि परा. या सूत्रांत भक्तीचें प्राधान्य विशेष सांगितलें आहे. आपल्या उद्धाराकरितां परमेश्वराची जी भक्ति करणें ती गौणी व आपण आपल्यावर जशी प्रीति करतो तशीच ईश्वरावर करणें ती पराभक्ति होय. हिलाच प्रेमलक्षणा म्हणतात. हें नांव भगवान् नारदांनीं दिलेलें आहे. शांडिल्य हिलाच पराभक्ति म्हणतात, व योगशास्त्रांतील ह्या समाधिपादांत हिलाच 'ईश्वरप्रणिधान' म्हटलें आहे. हिच्याच योगानें असप्रज्ञात समाधि सिद्ध होतो.

आपल्याला दोन प्रकारचें ज्ञान होतें. मी सगळ्यांहून निराळा आहें हें एक ज्ञान व मी ईश्वर आहें हें दुसरें ज्ञान. यांत मी सर्वांहून निराळा आहें हें जें वर सांगितलें, तें ज्ञान जर दृढ झालें तर त्याला संप्रज्ञात समाधि सिद्ध होतो, व दुसऱ्या ज्ञानानें असंप्रज्ञात समाधि होतो. ह्या समाधींत आनंदच उरतो. वास्तविक रीतीनें परमात्म्याचे सच्चिदानंद गुण हे निरनिराळे नाहींत. ते तसे भासतात मात्र. ह्यांत सत् म्हणजे आहेपणा, चित् म्हणजे ज्ञान व आनंद म्हणजे सुख. हें सुख असंप्रज्ञात समाधीनें मिळतें. सर्व विषयांची निवृत्ति होऊन मी ईश्वर आहें हें ज्ञान झालें म्हणजे असंप्रज्ञात समाधि सिद्ध होतो. व तो होण्याकरितां निर्गुण आणि सगुण हे दोन्ही प्रकार जाणले पाहिजेत. निर्गुण म्हणजे विषयनिवृत्ति होऊन ब्रह्मांत मिळून जाणें आणि सगुण म्हणजे अंतरबाह्य प्रेमानें ब्रह्मच वाटणें.



ब्रह्मांत मिळालें कीं निर्गुण व वृत्तीवर आलें कीं सगुण. मिळून दोन्हींकडे वृत्तीला सवड नसली म्हणजे असंप्रज्ञात-समाधि सिद्ध होतो. परमेश्वर सगुण व निर्गुण जाणला पाहिजे असें श्रुति व स्मृति सांगतात. तीव्र संवेग जरी नसला तरी भक्तीच्या योगानें समाधि सिद्ध होतो.

शिष्य :– महाराज, मागच्या निरूपणांत आपण सांगितलें कीं, तीव्र संवेगानें योग सिद्ध होतो व आतां असें सांगता कीं तीव्र संवेग नसला तरी ईश्वराच्या भक्तीनें असंप्रज्ञात समाधि सिद्ध होतो–हें कसें ?

गुरु :– यावर एक दृष्टांत घेऊन तुला सांगतो–

राजा जो आपल्या नोकरांना पगार देतो, तो बरोबर काम केल्यावर देतो. परंतु राजपुत्रांनीं काम केलें म्हणजेच त्यांना खाऊं घालतो नाहीं तर नाहीं असें नाहीं. त्याप्रमाणें योग्यांनीं तीव्र भावना केली तरच समाधि होतो. परंतु भगवद्भक्तांची तीव्र भावना नसली तरी परमेश्वरच त्यांची तीव्र भावना करून देऊन त्यांना समाधि साध्य करून देतो. **भक्ति म्हणजे प्रेम अतिशय वाढणें**. वरच्या दृष्टांतांत आपल्या मुलांना जसा राजा काम न केलें तरी खाऊं घालतो, तसा परमात्मा भक्तांची भावना तीव्र नसली तरी त्यांना सगुणमूर्तीचें ध्यान, भगवद्गुणश्रवण, संतांच्या कथा, भगवंताविषयीं प्रेमानें अश्रु येणें इतक्या गोष्टींनींच अतिशय प्रेम वाढवून देऊन समाधि करून देतो.

आतां परमेश्वरच भक्तीस पात्र कसा आहे तें सांगतों– तो केव्हांच परतंत्र नाहीं, म्हणजे बद्ध नाहीं. आपण कितीहि ज्ञानी झालों तरी मुक्त होऊन आपण आतां ब्रह्मांतच मिळून जाणार. परंतु परमेश्वर हा नित्यमुक्त आहे. मिठाचा खडा समुद्रांत टाकला तर तो समुद्रांत मिळून जातो. तसे मुक्त जीव त्या परमात्म्यांत मिळून जातात. म्हणून त्या नित्यमुक्त परमेश्वराची बरोबरी आपल्याच्यानें कशी करवेल ? तो परमेश्वर नित्य मुक्त असूनही राम-कृष्णादि अवतार घेतो, ते केवळ जीवांच्या कल्याण्यासाठींच घेतो, म्हणून त्याची भक्ति करणेंच आपल्यास इष्ट आहे.

कामक्रोधादि विकार मनांत असून योग करणारा कोणीच तरला नाही परंतु कंस वगैरे जे दैत्य झाले त्यांच्या मनांत क्रोधही होता व भक्तिही होती. तरी त्यांना मुक्ति मिळाली. यावरून त्यांना भक्तिच फळली हे सिद्ध झालें. परंतु योग जर त्यांना असता तर, दुसऱ्याही जन्मांत त्यांना ज्ञान झालें नसते. भगवान् ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

अगा मी एक लाणीचें खागें । मज येवो ये भलतेनि मार्गे ।।
भक्ति कां विषयविरागे । अथवा वैरे ।। (ज्ञा. ९-४७०)

म्हणजे मी एक रस्त्यावर पडलेले धन आहें. कोणीही व कशाही उपायानें मला लुटून न्यावें. भक्ति, विषयप्रीति अथवा वैर यांपैकी कोणत्याही रीतीनें मला लुटावें. जो मी परमात्मा मोठमोठ्या तापसांना तपाचें



फळ देतों तेंच फळ भक्तांना भक्तीनें देतो. देव पुढें सांगतात :–

" तैसा गोपिकांसीं कामें ।। तया कंसा भयसंभ्रमें ।।
येरां घातकां मनोधर्में ।। शिशुपालादिकां ।।४६९।। "

( ज्ञा. अ. ९)

श्रीकृष्णानें पति होऊन आमच्या इच्छा पुरवाव्या अशा कामभावानें जरी गोपींनीं भक्ति केली तरी त्या सर्व भक्तांत वरिष्ठ ठरल्या. अशा प्रकारचा जो परमात्मा तो प्रेमभक्तीनें वश होतो. व आपल्या अंगीं तीव्र भावना नसली तरी तो करून घेतो.

मात्र विरोधभक्ति करूं नये. कारण कंसादिकांनीं विरोधभक्ति केली तरी त्यांना परमेश्वरावांचून दुसरा कोणीच शास्ता उरला नव्हता. येवढा त्यांचा त्रैलोक्यांत दरारा होता. म्हणून त्यांचें करणें योग्य होतें. परंतु आपल्याला कोणींहि सहज थप्पड देऊं शकेल. दुसरें असें कीं, मुतांतही आपलें तोंड दिसू शकतें, व आरशांतही दिसतें, मग आरशांतच कां पाहूं नये ? मुतांत पाहून काय फायदा ? त्याप्रमाणें प्रेमानेंच ईश्वर मिळवावा, विकारानें मिळविण्याची इच्छा करू नये. आपलें मन अनेक विकारांनीं विटाळलें असलें तरी आपण एकदां भक्ति करूं लागलों कीं ते सर्व विकार आपोआप चटसारे नाहींसें होतात. भगवान् म्हणतात –



" अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्
साधुरेव स मंतव्यः सम्यग् व्यवसितो हि सः ॥ "

(गीता ९–३०)

अतिशय दुराचारी असला व मला जर अनन्य भावानें भजतो, तर त्याला तूं साधु समज. रोहिल्यासारखे–आरबासारखे तामस- नव्हे आसुरी प्रकृतीचे लोक माणिक-प्रभूची भक्ति करून उद्धरले तर इतरांची कथा काय ? ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, एखादा मनुष्य महापुरांत बुडून पुन्हां बाहेर जिवंत निघाला तर त्याला बुडाला असें म्हणावें काय? त्याप्रमाणें पहिल्यानें कितीहि दुराचारी असला व नंतर भगवद्भक्त झाला तर त्याला तूं साधु समज. पाण्यानें जर सर्व मळ धुतले जातात तर सर्वांचें जीवन जो मी परमात्मा त्या माझ्याच्यानें काय भक्तांचे दुर्गुण धुतलें जाणार नाहींत ? भगवान् पुढें म्हणतात–

" क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ॥
कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ "

(गीता ९–३१)

हे अर्जुना ! तो माझा भक्त झाला तर लवकरच त्याचा दुराचार सुटून त्याचे सगळे दुर्गुण धुतले जातील. एवढेंच नव्हे तर त्याला उत्तम प्रकारची शांति प्राप्त होते, तो धर्मात्मा होतो. व नित्य शांति प्राप्त झाल्यामुळें त्याला

असंप्रज्ञात समाधि होतो. परंतु अर्जुना, माझा भक्त दुराचारी असला तरी कधींच नाश पावत नाहीं.

**योगाहून भक्तीची श्रेष्ठता व सौलभ्य**

योग साधणाऱ्याला पहिले दुराचार सोडावा लागतो. व भक्तीनें तो आपोआप सुटतो.

"तुका म्हणे जरी योगाची तातडी ।
आशेची बीबुडी करी आधीं ॥"

पद :- " भय्या जब तुम आसन मारो तो क्यंव
कारन आस न मारो ॥१॥ "

जर आशाच मारली नाहीं तर आसन मांडून काय उपयोग ? आपल्याला योगांत मृदु संवेग करावा लागतो, म्हणजे कल्पना आणून मन लावावें लागतें, परंतु भक्तींत ही मजा आहे कीं मन आपोआप लागते. म्हणजे एकदम मध्य संवेगापासून सुरुवात होते. व मग तीव्र संवेगाला फार वेळ लागत नाहीं. मात्र संवेग करावयाचा तो विषयावर करावयाचा नाहीं तर ईश्वराकडे करावयाचा. योगांत मन लावावें लागतें. पण भक्तींत तें ईश्वराकडे आपण होऊन ओढलें जातें. आतां ज्याच्या चित्ताला मुळींच द्रव नाहीं त्याची गोष्ट सोडा. परंतु ज्याचें चित्त थोडें बहुत प्रेमळ आहे त्याची एकदम मध्यसंवेगापासून सुरुवात होते. व जे



अत्यंत प्रेमळ आहेत त्यांचा एकदम तीव्र संवेग होतो. कारण ईश्वराची इच्छा अशी असते कीं, माझ्या भक्ताचा उद्धार व्हावा. परमेश्वराच्या इच्छेनें नद्या वाहतात, मेघ पाऊस पाडतो, समुद्र मर्यादा ओलांडित नाहीं, फार तर काय, परंतु परस्परांचे शत्रु जीं पंचमहाभूतें तींच देहांत एके ठिकाणी मिळून परस्पर मित्रत्वानें वागतात. ईश्वराच्या इच्छेनेंच पुण्यवानाला स्वर्गांत अमृतपान मिळतें, व पाप्याला नरकयातनाही त्याच्याच इच्छेनें होतात. ह्या गोष्टी जर परमेश्वराच्या इच्छेनें होतात तर त्याच परमेश्वराच्या इच्छेनें निष्काम भक्ताला समाधि कां नाहीं मिळणार ?

वार्तिककार म्हणतात– मंदाधिकारीही भगवद्भक्तीनें लवकर तीव्र होतो. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

"रोग जाय दुधें साखरें ।। तरी निंब कां पियावा ।।"

( ज्ञा. ४–२२३)

भक्तीनें जर समाधि साधतो तर डोळे दाबण्याची तरी किटकिट कशाला करावी ? तुकाराम महाराज म्हणतात–

"ऐसा सांडुनी सोहळा । कोण लावुनि बैसे डोळा ।।"

नाथमहाराज म्हणतात–

"योगी इंद्रियें कोंडिती । ते कोंडितांची कष्टी होती । .



भक्त भगवंतीं अर्पिती । तेणें ते होती नित्यमुक्त ॥"
(ए. भा. अ. २-२८९)

योगी इंद्रियें कोंडतात आणि ते कोंडतांना अति कष्टी होतात, परंतु भक्त इंद्रियें देवाला अर्पण करितात. म्हणून त्यांचें सहज इंद्रियदमन होतें व अनायासें समाधीचा आनंदही मिळतो. भक्ताचें देवाला हमेषा मागणें हेंच असतें-

"वाणी गुणानुकथने श्रवणौ कथायाम् ।
हस्तौ च कर्मसु मनस्तवपादयोर्नः ।
स्मृत्यां शिरस्तव निवास जगत्प्रणामे ।
दृष्टिः सतां दर्शनेस्तु भवत्तनूनाम् ॥३८॥"
(भाग. स्कं. १०-१०)

वाणी रामकृष्णाचे नामस्मरणामध्यें रंगावी, कानानें भगवंताचे गुण ऐकावे, हातानें फुलें आणून तुझी पूजा करावी, पायानें देवळांत चालून जावें. शिरानें तुमच्या पायांवर रहावें, मनानें नेहमीं तुमच्या मूर्तीचें ध्यान करावें, डोळयानें तुमच्याच तनू जे संत व गुरु त्यांचें दर्शन घ्यावें; अशा रीतीनें भक्तांचीं इंद्रियें अर्पण झालीं म्हणजे विषय सुटतात. इंद्रियांनीं वर सांगितल्याप्रमाणें आपआपलीं कामें केलीं म्हणजे चित्त हळू हळू एकाग्र होतें. भक्तीवांचून दुसरें कांहींच आवडूं नये. म्हणजे इंद्रियें हीं आपोआप ईश्वराकडेच लागतात. तुकाराममहाराज म्हणतात-



आणीक दुसरें मज नाहीं आतां ।
नेमिलिया चित्ता पासूनिया ।।
पाडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं ।
जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ।।

देवा ! पूर्वी जें कांही झालें तें झालें, परंतु जेव्हांपासून मी तुझें ध्यान धरलें तेव्हांपासून मात्र तुझ्या चरणांवांचून कांहींच पाहिलें नाहीं. येथें ध्यान धरणें हा मृदु संवेग झाला. ह्या अभंगांत तुकाराम महाराजांनीं आपल्या मनासच बोध केला. त्याचें कारण असें की, सत्पुरुषांना गुरु-शिष्यपणाचें बंड आवडत नाहीं, व मनाचे निमित्त करून उपदेश केला म्हणजे जे कोणी त्या उपदेशाचे अधिकारी असतील त्यांना त्याचा उपयोग होतो. असो. असें ध्यान करूं लागल्यावर पुढे मनही वळलें व जागृतींत आपोआपच मूर्तीकडे लागू लागले. व स्वप्नांतही पांडुरंग दिसूं लागला. तेव्हां तुकाराममहाराज म्हणतात–

"जागृतीं स्वप्नीं पांडुरंग" हा झाला मध्य संवेग. नंतर

"पडली वळण इंद्रियां सकळां ।
भाव तो निराळा नाहीं दुजा ।।"

हा झाला निरोध. निरोध झाल्यामुळें,

तुका म्हणे नेत्रीं केली ओळखण । तटस्थ हें ध्यान विटेवरी ।।

हा झाला तीव्र संवेग. हीच भक्ताची समाधि होय. तुकाराममहाराजांनीं आपल्या मृदु संवेगाचें उदाहरण एके

ठिकाणीं असें सांगितलें आहे-

"रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग ।
अंतर्बाह्य जग आणि मन ॥"

असो. ह्याप्रमाणें भक्तिच योगाचें सर्व श्रेय देणारी आहे. भगवद्गीतेंत अर्जुनानें प्रश्न केला आहे-

"एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ॥
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥१॥"

(गीता १२)

देवा, तुमचे सगुण भक्त श्रेष्ठ किंवा निर्गुणभक्त श्रेष्ठ ? देव म्हणतात अर्जुना, निर्गुण भक्तांना विषयाच्या ओढीमुळें अति कष्ट होतात. परमेश्वराचें साह्य त्यांना फारसें नाहीं व त्यांना त्याचाच जोर पाहिजे. पण जे सगुण भजतात त्यांचें मन आपोआपच एकाग्र होतें. म्हणून " तेषामहं समुद्धर्ता " त्यांचा उद्धार करणारा मी आहें म्हणून या सूत्राचा अर्थ भक्तिपरच केला आहे. तुकाराम महाराज म्हणतात :-

" सगुण निर्गुण दोन्ही ज्याचीं आंगें ।
तोची आम्हांसंगें क्रीडा करी ॥"

ब्रह्माच्या दृष्टीनें निर्गुण व जगाच्या दृष्टीनें सगुण मिळून भक्तांना परमेश्वर दोहींकडे असतोच. नाथ म्हणतात-



" वाचा नियमावी माझेनि नामें । मन नियमावें ध्यानसंभ्रमें ।
प्राण नियमावा प्राणायामें । इंद्रियें दमें नियमावीं ॥
बुद्धि नियमावी आत्मविवकें । जीव नियमावा परमात्मसुखें ।
इतुकियानें तू अवश्यकें । होशी कौतुकें मद्रूप ॥ "

" तें नाम सोपें रे रामकृष्ण गोविंद ।
वाचेसी सद्गद जपा आधीं ॥" (ज्ञा. ह. अभंग)
" गोविंद गोविंद । मना लागो हाचि छंद । "
(तुका. गा. )

नाम घेतां घेतां प्रेम दाटून भक्तांचा कंठ सद्गदित झाला म्हणजे त्यांचा आपोआप प्राणायाम होतो. नाक वगैरे दाबण्याची जरूर नाहीं. मात्र भक्तींत इंद्रियें सैराट सोडू नयेत. बुद्धीनें नेहमीं जडचैतन्याचा विवेक करीत जावा. आत्म्यानें नेहमीं मी आत्मा असंग आहे, स्वयंप्रकाश आहें अशा प्रकारचा विवेक जागृत ठेवावा. नाथ म्हणतात–

" नाम स्मरता म्हणुनी आचराल दोष ।
तरी श्रवण मनन भक्ति पडेल ही ओस ॥"

नामस्मरण करीत असतांना आपल्या हातून दोष घडू नयेत म्हणून काळजी घेत असावें. भक्तीवांचून जे योग करितात त्यांची अशी स्थिति होते. भागवतांत म्हटलें आहे–

" मुमुक्षूणामभक्तानां प्राणायामादिभिर्मनः ॥



अक्षीणवासनं राजन् दृश्यते पुनरुत्थितम् ।।

(भाग स्कं. १०-५१

भगवान् मुचकुंदाला म्हणतात:- राजन्, माझ्या भक्तीला सोडून प्राणायामादिकानें ऋषि मुनि ब्रह्मांत मन लावतात. तें लागतें खरें, परंतु त्यांचा विषयाकडील ओढा कमी झाला नसल्यामुळें त्यांची वासना पुन: पुन्हां उत्थान होते, परंतु तेंच मन भक्तीनें ईश्वराकडे लावलें असतां तें सहज नेहमीं लागून राहतें व प्रेमभक्तीनें समाधीही आपोआप साधतो. भक्ति, ज्ञान, वैराग्य या तिहींचाही अभ्यास ठेवावा. परंतु भक्ति ही अवश्यच पाहिजे.

आतां एक रहस्य सांगतों तें असें कीं:- पाण्यांतही सूर्याचें प्रतिबिंब दिसतें व कांचेंतही दिसतें. परंतु भेद इतकाच कीं कांचेंतल्या प्रतिबिंबांत तेज जास्त असतें व प्रसंगविशेषीं काडीकचराही त्यानें पेट घेतो. त्याप्रमाणें नुसत्या निर्गुण ब्रह्मापेक्षां सगुणानें विषय आपोआप सुटतात. म्हणूनच ईश्वरप्रणिधानानें योगसिद्धी लवकर होते, असें सांगितलें. सूत्रांतील " वा " हें अव्यय निश्चयार्थी आहे. 'अथवा' म्हणजे विकल्पार्थी नाहीं. म्हणून ईश्वर प्रणिधानानें योगसिद्धि होतेच, असा अर्थ करावयाचा. ब्रह्मापलीकडे कोणी देवता नाहीं म्हणून आपल्याला ज परमेश्वराची तनु आवडेल तिचेंच प्रेमानें सेवन करावें.

शिष्य :- आतांपर्यंत आपण देवाची भक्ति करावी



असें सांगितलें, परंतु संप्रदायांतली रीति

यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ (श्वे. अ. ६)

अशी श्रुतींनीं सांगितली आहे. म्हणून ईश्वर व गुरु यांची समान भक्ति ज्याची होईल त्यालाच ईश्वराची प्राप्ति लवकर होईल.

गुरु :— ईश्वर कोण ? तर ब्रह्मरूपच. जीव हा पहिलें बद्ध असून नंतर मुक्त झाल्यावर ज्या ब्रह्मामध्यें मिळून जातो तोच ईश्वर होय. ईश्वर कधींच बद्ध झाला नाहीं म्हणून तोच सर्वांचा गुरु होय. म्हणून जीवाला ईश्वराची भक्ति करणें अवश्य आहे. याला प्रमाण श्रुति—

यं सर्वे देवा नमंति मुमुक्षवो ब्रह्मवादिनश्च ।

तो ईश्वर सामर्थ्यवान् आहे. म्हणून सर्व देव त्याला नमस्कार करितात. मुमुक्ष ज्ञान होण्यासाठीं त्याला भजतात, व ज्ञानो त्याची भक्ति केवळ प्रेमानें करतात. याप्रमाणें एका भक्तीनेंच योग हा सफळ होतो. वामनपंडित म्हणतात—

सफल सकल योग श्रीहरीच्याचि पायीं ।
मग श्रम करणें कां आणिकांहीं उपायीं ।।

भागवतांत म्हटलें आहे—

आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे ।
कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ।।१०।।

(भा. स्कं. १—७)



पतिव्रतेच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्यावर म्हातारपणांतही तिला पतीचीच सेवा करणें आवडतें, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञान झाल्यानंतरही भक्तांना भगवद्भक्तिच आवडते. समुद्र हा खारट आहे परंतु मेघद्वारा त्याचें पाणी गोड होतें; त्याप्रमाणेंच ज्ञान व भक्ति ज्यास आहे तोच भक्त श्रेष्ठ होय. मुक्तांना आत्मज्ञान होऊन ते पूर्ण झाल्यावरही भगवद्भक्तिच करीत राहतात. मग आपण तर साधकच आहोंत. आपणास भक्ति अवश्य केलीच पाहिजे. सारांश, भक्तीच्या योगानेंच समाधियोग लवकर सिद्ध होतो. आतां हा ईश्वर कसा आहे हें पुढील सूत्रांत सांगतील.

हरिःॐतत्सत् श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥

(ता. १८–१०–०७)



**क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः ॥२४॥**

**तत्र निरतिशयं सार्वज्ञबीजम् ॥२५॥**

गुरु :– मागें प्रणिधान म्हणजे भक्ति सांगितली. आतां ईश्वर कसा आहे हें दोन सूत्रांत सांगतात–

क्लेश–दुःख देणारे पदार्थ. हे पदार्थ अनेक आहेत. जसे-कांटे, गोटे वगैरे. या सर्वांचा समावेश पांच पदार्थांत होतो. ते पांच प्रकारचे क्लेश असे–अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश.



अविद्या म्हणजे विपर्यय, जडावर चैतन्याची बुद्धि होणें, अशुद्ध वस्तूला शुद्ध मानणें किंवा देहालाच आत्मा मानणें. हीच विपर्यय वृत्ति होय.

अस्मिता—जाणणारा आत्मा व जाणण्याची वस्तु देह. देह हा जड असून, मीच देह आहें असें समजणें, हो अस्मिता होय.

सुखाचे ठिकाणीं प्रीति असणें तो राग; व दुःखाची आवडी नसणें तो द्वेष. अभिनिवेश म्हणजे मरणाची भीति. हे पांच प्रकारचे क्लेश. पाप पुण्य हें कर्म. कर्मांचीं निर-निराळीं फळें हा विपाक. व त्यापासून होणारें सुख दुःख हे आशय.

वर सांगितलेले क्लेश, कर्म, विपाक आणि आशय हे ज्याला कोणत्याच कालीं स्पर्श करीत नाहींत, असा जो आत्मा तो ईश्वर होय.

शिष्य :- सांख्य आणि वेदांत ह्या दोघांच्याही रीतीनें आत्म्याला बंधन नाहीं, सर्वांचे आत्मे मुक्त आहेत, तर मग ईश्वर कशाला मानावयास पाहिजे ?

## ईश्वर सिद्धि

गुरु :– ही शंका बरोबर नाहीं. जरी सर्वांच्या आत्म्याला क्लेश होत नसले तरी ते अविद्येच्या योगानें भासतात. केसांवर कांच ठेविला म्हणजे तो चिरफळल्या



झालेला–फुटलेला दिसतो. जपाकुसुम म्हणजे जास्वंदीचें फूल कांचेजवळ ठेविलें तर कांच लाल दिसतो. तसें, मनाचें सुख दुःख आत्मा मानून घेतो. लढाईमध्यें जयपराजय हे सैन्याला होतात; तरी हारीजितीचा पक्ष राजावरच येऊन पडतो. तसेंच सुख दुःख हे वास्तविक मनाचे असून, जीव ते आपल्यावर ओढून घेतो. जीव जसा मी भोक्ता आहें, असा आरोप करतो, तसा ईश्वर केव्हांच मानीत नाहीं, म्हणून इतर जीवांपेक्षां तो ईश्वर परमात्मा वरिष्ठ आहे. दुसरेंही एक कारण त्याला वरिष्ठ होण्याला आहे.

"नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेनं मुह्यंति जंतवः ॥"

(गीता ५–१५)

भगवान् म्हणतात–परमात्मा हा कसा आहे ? तर तो कोणाचें पापही घेत नाहीं व कोणाचें पुण्यही घेत नाहीं

शिष्य :– असें आहे तर पापपुण्य कोण घेतो ?

गुरु :– जीवच तें आपल्यावर ओढून घेतो. पण हेंही म्हणणें ईश्वराला खपलें नाहीं. तो म्हणतो, "अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥" खरोखर जीवांचें ज्ञान अज्ञानामुळें झांकलें गेलें आहे म्हणून मी पापपुण्य करतों, असा ते मोह पावतात.

शिष्य :– हें अज्ञान जीवालाच कां ? ईश्वराला कां नाहीं ?



गुरु :– याचें उत्तर असें कीं, अज्ञान हें अनादि आहे व ज्ञानानें त्याचा नाश होतो.

शिष्य :- अज्ञान हें कसें आलें ?

गुरु :- अज्ञान हें कसें आलें ? कोठून आलें ? याचा शोध करणें व्यर्थ आहे. अग्नीला धुपट होतें तसें सूर्याला कां होत नाहीं ? पाणी थंड कां ? व अग्नि उष्ण कां ? याचें उत्तर काय देणार ? ते पहिलेपासूनच तसे आहेत इतकें सांगतां येईल. तसेंच अज्ञान अनादि आहे इतकें सांगण्यापलीकडे त्याचा शोध लागत नाहीं. जोंपर्यंत आपण झोंपेंत आहों तोंपर्यंत स्वप्नाचा शोध कसा करणार ? व कोण करणार ? कारण आपला देहही स्वप्नांतलाच असतो. बरें जागें झाल्यावर स्वप्नाचा शोध करावा तर जागेपणीं स्वप्नच नाहींसें होतें ! तसाच दोरीवर होणारा सर्पाचा भ्रम. भ्रम असतो तोंपर्यंत भ्रमाचा शोध कसा लागणार ? व भ्रम गेल्यावर तो भ्रम कोठें पाहावयाचा ? त्याप्रमाणें अज्ञान आहे तोंपर्यंत अज्ञानाचा शोध लागत नाहीं; व ज्ञानानें तें दूर झालें म्हणजे अज्ञानच रहात नाहीं. म्हणून अज्ञानाचा शोधच करण्याची जरूर नाहीं.

तें कसें जाईल याचा शोध करावा. जेवणाचे वेळीं हे तांदूळ कोठून आले, कोण्या शेतांत पेरले, अशी चिकित्सा केल्यानें कांहीं भूक जात नाहीं; तर चुपचाप जेवून घ्यावें. तसेंच, वस्त्रास डाग जर लागला, तर तो कसा लागला,



कोणी लावला, कां लावला, इत्यादि शोध करण्यांत अर्थ अर्थ नाहीं; धुवून काढला म्हणजे झालें. त्याप्रमाणेंच अज्ञान कोठून आलें, याचा शोध न करितां त्याच्या नाशाचा उपाय करावा, भगवान् म्हणतात– जीव अज्ञानानें पापपुण्य आपल्यावर ओढून घेतात; व परमेश्वर घेत नाहीं; म्हणून तो जीवाहून वरिष्ठ आहे.

### ईश्वराचें वरिष्ठत्व

शिष्य :– बद्धजीवापेक्षां परमेश्वर वरिष्ठ असेल; पण मुक्त जीवापेक्षां तो कसा वरिष्ठ होईल ? कारण मुक्त जीवाचें अज्ञान गेलें असतें.

गुरु :– ह्याचें उत्तर भाष्यकार सांगतात. मुक्त-जीवांना आज जरी बंधन नाहीं तरी पूर्वीं होतें व आज ते मुक्त झाले. पण ईश्वरामध्यें हें बंधन केव्हांच नव्हतें. असें बंधन ईश्वराला पूर्वीं होतें व नंतर तो मुक्त झाला असें मानलें तर, प्रत्येक कल्पांत वेद नवीन झाले पाहिजेत. कारण ज्या ज्या कल्पांत मुक्त जीव आहेत, त्या त्या कल्पांत त्यांना मुक्त होण्यास एकच वेद कामी पडले. प्रत्येक कल्पांत वेद नवीन झाले नाहींत. ईश्वर जर नित्य मुक्त नसता, तर त्याचें वचन (वेद) फारसें प्रमाण झालें नसतें. परंतु परमेश्वरास केव्हांच अज्ञान झालें नाहीं. गीतेंतहीं भगवान असेंच म्हणतात–



ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥१६॥
(गीता अ. २)

ज्ञानाचे योगाने ज्यांचें अज्ञान नष्ट झालें आहे, त्या मुक्त जीवांचें ज्ञान सूर्याप्रमाणें ब्रह्माला प्रकाशित करतें; म्हणजे त्या ज्ञानाच्या योगानें ते ब्रह्म होतात. म्हणून मुक्तजीवापेक्षांही ईश्वर वरिष्ठ आहे.

शिष्य :– मुक्तजीवांनाच ईश्वर कां म्हणू नये ?

**ईश्वर एकच**

गुरु :– मुक्तजीवांनाच ईश्वर म्हणावें तर ते एक कीं अनेक ? मुक्तजीव जर एक मानला तर बद्ध जीव एक कीं अनेक ? बद्ध जीव जर एक मानला तर सगळे मुक्त झाले पाहिजेत. मग बद्ध एक व मुक्त अनेक झाले तर त्या अनेक मुक्त जीवांत एक मुख्य मानला पाहिजे कीं, ज्यांच्यांत सर्व बद्ध जीव मिळतील. व तसा एक मुक्त जीव घेतला तर तो असा पाहिजे कीं, त्याला पूर्वी कधींच अज्ञान नव्हतें. मग तोच नित्य मुक्त जीव म्हणा कीं ईश्वर म्हणा.

योगवसिष्ठांत ईश्वरालाच नित्य मुक्तजीव म्हटलें आहे. किंवा बद्ध एकच व मुक्तही एकच मानला तर एक मुक्त झाल्यानें सगळेच जीव मुक्त व्हावेत. असें झालें तर पूर्वी व्यासादिक मुक्त होऊन गेलेच आहेत;



आतां आपण मुक्त होण्याची धडपड कशाला करावी ? देहासच आत्मा मानणें हें अंत:करणांत असलेल्या कमीपणामुळें होतें. उत्तम वेदांतांत ह्याला **जीवाभास** म्हणतात. घटाच्या भेदानें पाण्याचा भेद होतो; म्हणजे पाणी एकच; परंतु घट निरनिराळे असल्यामुळें पाणी निरनिराळें दिसतें. त्याप्रमाणें आपण न्यूनपणा घेतों तेव्हां आपण अनेक झालों असें वाटतें. म्हणून मुक्तजीव हा एकच आहे. बद्ध जीव मुक्त होऊन मिठाचा खडा समुद्रांत विरघळून जातो त्याप्रमाणें नित्य मुक्तांत मिळतात. पण समुद्र जसा एक असतो तसा नित्य मुक्त एक घेतला पाहिजे. व मुक्ताच्या हातून बद्ध मुक्त झाला पाहिजे. म्हणून ज्याच्यांत तुम्हीं सर्व मिळणार असा एक नित्य मुक्त जीव घेतलाच पाहिजे. तोच परमेश्वर होय. आतां मुक्तजीव अनेक मानले व ईश्वर न मानला तर सर्व मुक्तजीव सारखेच झाले. मग एकाची इच्छा सृष्टि करावयाची झाली तर दुसऱ्याची इच्छा न करण्याची होईल. मग एकमेकांत द्वेष उत्पन्न होऊन त्यांच्यांत लढाई लागेल. व हे धर्म जीवाचे होत. म्हणून ते सर्व जीवच होतील ! याकरितां एक कोणी तरी वरिष्ठ मानलाच पाहिजे. हा झाला वेदांतवाद;

सांख्यांच्या दृष्टीनेंही प्रकृतिपुरुषाचा संयोग परमेश्वरावांचून होत नाहीं.

मत्तः परतरं नान्यत् किंचिदस्ति धनंजय ।



मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥

(गीता अ. ७)

ह्या श्लोकावर ज्ञानेश्वरमहाराजांनीं केवळ अद्वैतपर टीका केली आहे. ते म्हणतात– मणीही सोन्याचेच व सूतही सोन्याचेंच. सोन्याच्याच सुतांत सोन्याचे मणी ओवावे तसे माझ्यामध्यें सर्व जीव (जग) आहेत. यावरून सर्वांपेक्षां ईश्वरच श्रेष्ठ झाला. त्याला कोणा शंकर, विष्णु, ब्रह्मा फार तर काय कुदळी, फावडें (कोणाच्या येथें कुदळी, फावड्याचीही देव समजून पूजा करितात.) या रूपानें भजतात. परंतु ईश्वर एकच होऊं शकतो. अनेक मानणें शक्यच नाहीं. अशा प्रकारचा जो हा परमात्मा त्याच्याच सत्तेनें जड चैतन्याचा किंवा प्रकृतिपुरुष संयोग होतो. नोकराची जशी चाकरी असेल त्याप्रमाणें मालक त्याला पगार देतो. त्याप्रमाणें **माया ही जीवाच्या कर्मानुसार ईश्वराच्या इच्छेनेंच जग निर्माण करते**. ईश्वराच्या इच्छेनें सर्व होतें.

शिष्य :– ईश्वराला मनच नाहीं तर इच्छा कोठली आली ?

## ईश्वर सत्यसंकल्प

गुरु :– या शंकेचें समाधान असें– ईश्वराला इच्छा नाहीं. त्याची **इच्छा म्हणजे ईक्षण. ईक्षण म्हणजे सत्यसंकल्प**.



ईश्वराची इच्छा ही ईश्वररूपच आहे. त्याच्या इच्छेनेंच चांगलें वाईट बनतें. जीवाची इच्छा पदार्थानुसार असते; परंतु ईश्वराचें तसें नाहीं.

ईश्वर हा सत्यसंकल्प असल्यामुळें त्याच्या इच्छेनेंच सर्व पदार्थ उत्पन्न होतात. आपणास जागेपणीं चांगलें जेवण असलें तर जेवावेंसें वाटतें. परंतु स्वप्नांत आपण वासनानुकूल विषय उत्पन्न करितों. जागृतींत विषयानुसार वासना उत्पन्न होते. ह्यावरून जीवाची इच्छा पदार्थ व गुण ह्यांच्या अनुरोधानें चांगली वाईट होते. विज्ञान भिक्षु म्हणतात–

" न हि स्वप्नदृष्टांतसमो उपायोऽस्त्यात्मदर्शने "

योगवासिष्ठांत म्हटलें आहे–

स्वप्नसंभ्रमसंकल्पस्वानुभूतिपरंपरा ॥

प्रमाणान्यत्र मुख्यानि संबोधाय प्रदीपवत् ॥

ह्या वचनांचें तात्पर्य असे कीं, इच्छा आणि अनुभव हे जसे आत्मदर्शनाला मुख्य प्रमाण आहेत तसे प्रत्यक्षादि नाहींत. जीवाचें अज्ञान अनादि असल्यामुळें त्यांच्या त्यांच्या कर्मानुसारच प्रकृतीला सृष्टि निर्माण करावी लागते. किंवा परमात्म्याच्या इच्छेनें प्रकृतीच जीवाच्या कर्मानुसारच जगत् बनते व ईश्वराची इच्छाही ईश्वररूप आहे हे वर सांगितलेंच आहे. यावरून प्रकृति ही ईश्वराचेंच रूप झाली.

येथें आपण नाटकाचें उदाहरण घेऊं. सूत्रधार नटींचें



रूप घेऊन नानाप्रकारचे खेळ करून दाखवितो. ते खेळ ज्यांचे त्यानें पैसे घेतले आहेत त्या लोकांच्या इच्छेनुसार असतात. त्याप्रमाणें प्रकृति ही एक नटीच आहे व ती ईश्वराचेंच रूप आहे. यांत मजा काय होते कीं, निमित्त व उपादनकारक हे एकच होतात.

**ईश्वरसिद्धिला शाब्द प्रमाण**

शिष्य :– ईश्वरानें हें जगत् इच्छेनें केलें याला प्रमाण काय ?

गुरु :– ईश्वरानें हें जगत् इच्छेनें केलें याला वेदच प्रमाण आहेत. परमात्मा गीतेंत म्हणतात–

मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।।
हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ।।१०।। गी. ९

मी अध्यक्ष म्हणजे साक्षी असल्यामुळें प्रकृति निरनिराळें जगत् उत्पन्न करिते. यावरून ईश्वरी इच्छेनें जग झालें हें शाब्दप्रमाणानेंच कळतें. उदाहरण–'घट' कुंभार करितो, बुगडीं ही सोनारानें केली, हें ज्ञान आपल्याला अनुमानानें होतें; परंतु त्या कुंभाराचें अगर सोनाराचें नांव कळण्याला शाब्दप्रमाणच पाहिजे. हा घट जैराम कुंभारानें केला असें कोणीतरी आपल्याला सांगितल्याशिवाय त्याचें नांव कळूं शकत नाहीं. त्याप्रमाणें जगत् ईश्वरानें केलें हें आपल्याला तर्कानें कळेल, परंतु इच्छेनें

केलें, हे कळण्याला शाब्दप्रमाणच मानिलें पाहिजे. तें शाब्दप्रमाण वेद हेच होत.

मात्र 'इच्छा' या शब्दाचा अर्थ येथें गौण इच्छा असा आहे. जसें, मृगजल–मृगजल हें भासतें सूर्यामुळेंच; परंतु सूर्याला तें ठाऊकही नसतें. बरें, सूर्य नसला तर मृगजल होतही नाहीं. दुसरें उदाहरण– दोरीवर सर्प; आपणांवर सर्पाची भ्रांति होत आहे हें दोरीला माहीत नसतें, तरी पण दोरी असल्यावांचून भ्रांतिही होत नाहीं. त्याप्रमाणेंच ईश्वरही जगत् उत्पन्न करण्याची इच्छा करीत नसून जगत होतें, परंतु त्याच्या शिवाय मात्र तें होत नाहीं. ह्यालाच गौण इच्छा म्हणतात. व म्हणूनच वरच्या श्लोकांत ' मयोध्यक्षेण ' म्हणजे ' मी साक्षी असल्यामुळें ' असे शब्द वापरले आहेत. असो. याप्रकारचा परमात्मा सर्वापेक्षा वरिष्ठ आहे व तो सर्वज्ञही आहे. आतां सर्वज्ञ म्हणजे काय हें पुढल्या सूत्रानें सांगतील–

**ईश्वर सर्वज्ञ**

**तत्र निरतिशयं सार्वज्ञबीजम्** ।। २५ ।।

गुरु :– या जगांत इंद्रियानें होणारें ज्ञान असो अगर इंद्रियानें न होणारें अतींद्रिय ज्ञान असो, त्याला एकापेक्षां एक उंचपणा आहे. व या उंचपणाला कांहींतरी अवधि असली पाहिजे. अवधि–समाप्ति. जगांतल्या ज्ञानां



कमी जास्तीपणा भासतो. झाडांना थोडेंसें समजतें, त्यापेक्षां मुंगीला जास्त समजतें, मुंगीपेक्षां हत्तीसारख्या पशूला जास्त शाहाणपणा असतो, हत्तीपेक्षां वानर कांहीं अधिक गोष्टी जाणतो व सर्व प्राण्यांत मनुष्य हा बुद्धींत श्रेष्ठ आहे. हा जो ज्ञानांत कमी जास्तपणा भासतो त्याला कारण चित्ताची एकाग्रता होय. व्यग्र चित्तानें ज्ञान होत नाहीं. जसजसें चित्त एकाग्र होतें तसतसें ज्ञान जास्त होतें. थोडेसें चित्त कानावर एकाग्र केलें तर कानांतला नाद ऐकू येतो. ह्या चित्ताच्या भूमिका मागें सांगितल्या आहेत. ( पृष्ठ ६ पाहा. ) ज्या ज्या जीवाला अज्ञान जसें जसें दृढ असतें, तसें तसे त्याचें ज्ञान कमी असतें. खरोखर पाहिलें तर सर्वांत व्यापक पदार्थ कमी जास्ती कधींच असू शकत नाहीं, तो कमी जास्ती भासतो तो उपाधीमुळें. सगळ्यापेक्षां आकाश, हें व्यापक आहे. परंतु घरांतलें आकाश, हें घर व घट या उपाधीमुळें कमी जास्त असतें. मन हें आकाशापेक्षांही व्यापक आहे. व मनापेक्षांही ब्रह्म हें व्यापक आहे. ही व्यापकाची सीमा जशी ब्रह्मांत संपली, तशीच ज्ञानाची सीमा ईश्वरांत संपते म्हणून ईश्वर सर्वज्ञ आहे,

गीतेंत भगवान् अर्जुनाला असें सांगतात–

बहुनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ।।५।।

(गीता –४)



यावरून देवांनीं आपला सर्वज्ञपणा व्यक्त केला आहे. अर्जुन हा देवाचा सखा होता. तरी सर्वज्ञ नव्हता. तुकाराम-महाराज म्हणतात–

सकल गुणसंपन्न । हें तों देवाचें लक्षण ॥
कोठें कांहीं कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं ॥

सर्वज्ञता हें देवाचें लक्षण आहे.

शिष्य :– मुक्तापेक्षां (ज्ञान्यापेक्षां) परमात्मा सर्वज्ञ असतो काय ?

गुरु :– होय. परमात्मा हा ज्ञान्यापेक्षांही सर्वज्ञ असतो. मुक्त म्हणजे पूर्वीं एके काळीं बद्ध असलेला जीव ज्ञान झाल्यामुळें मुक्त होऊन परमात्म्यांत मिळाला असतो. मिठाचा खडा जर समुद्रांत टाकला, तर त्याचा मीठपणा जाऊन तो समुद्रांत मिळून जाईल हें खरें, पण त्याला पुन्हा वर जाऊन पाऊसरूपानें मात्र पडतां यावयाचें नाहीं. तसा मुक्ताकडेही जगत् निर्माणसंबंध येऊं शकत नाहीं. याला प्रमाण

'जगद्व्यापारवर्ज्यं प्रकरणादसन्निहितत्वाच्च'

(ब्र सू. अ. ४-४-१७)

जगत्व्यापार वर्ज्य करून मुक्त जीवाला सर्व शक्ति प्राप्त होतात. कारण मुक्तजीव परमात्म्यांत मिळून जातात निराळे राहात नाहींत.



श्रुतींतही ईश्वरच जगत्कर्ता सांगितला आहे. कारण मुक्त जो आहे तो आज मक्त झाला काल नव्हता. या कल्पांत जो पहिले मुक्त झाला तो मागल्या कल्पांत मुक्त नव्हता. मग मागल्या कल्पांतली सृष्टि कोणीं केली ? मुक्त जीवच जर जगत्कर्ता मानला तर त्यांच्या इच्छाही निरनिराळ्या होतील. मग एका ईश्वरानें पांच ज्ञानेंद्रियें व मन केलें आहे तर दुसरा ईश्वर सहा ज्ञानेंद्रियें व मन करील. एखादा ईश्वर कालच्या ईश्वरानें केलेल्या सृष्टीचा नाश आजच करील. याप्रमाणें एकमेकांचें वचनही खोटें पडेल. म्हणून मुक्त जीवांना जगत् करण्याचा अधिकार मिळत नाहीं.

श्रुतिशास्त्रानें ईश्वरच जगत्कर्ता सांगितला आहे. नास्तिकवादांतही सृष्टीचें एकएकच कारण घेतलें आहे. कोणी शून्य हें कारण घेतात; कोणी स्वभावाला सृष्टि-कारण मानतात, व कोणीं कालच जगत्कारण मानतात; पण ते जडानें सृष्टि होते म्हणतात. जड हें स्वतःच कांहीं करूं शकत नाहीं, तर सृष्टि कशी करू शकेल ? आचार्य म्हणतात– 'न ह्यचेतनं चेतनेन विना स्वतंत्रं प्रवर्तते प्रवर्तयति वा' जड हें चेतनाच्या साहायावांचून कोणाला प्रवृत्त करीत नाहीं व स्वतः प्रवृत्तही होत नाहीं, म्हणून सर्वचेतन परमात्मा हा मुक्त जीवांहूनही श्रेष्ठ झाला. तुकाराममहाराज म्हणतात–



ऐसे तुम्ही काय झाले रे जाणते । देवाही परते तुका म्हणे ।।

परमात्मा हा मुक्त व बद्ध आत्म्यापेक्षांही श्रेष्ठ आहे.

शिष्य :– परमात्मा मुक्त व बद्ध आत्म्यापेक्षां श्रेष्ठ आहे हें आम्ही कबूल करितों. परंतु तो प्रकृतिलीन व ब्रह्मलोकास गेलेल्या लोकांपेक्षा मात्र वरिष्ठ नसेल. कारण त्यांच्या इच्छेनेंच जगत् निर्माण होतें व त्यांना सुखही पुष्कळ आहे.

गुरु :- हीही शंका बरोबर नाहीं. कारण विदेहयोगी, प्रकृतिलीन योगी व ब्रह्मलोकास गेलेले यांना पुन्हां जन्म घेऊन बंध होतो; तसा ईश्वरास होत नाहीं. मागें झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. पुढें होईल म्हणावें, तर मग मुक्तालाही पुढें बंध झाला पाहिजे; व असें होईल तर शास्त्र हें खोटें झालें. मग क्षणोक्षणीं मोक्ष व क्षणोक्षणीं बंध मानावा लागेल.

सांख्यसूत्रकार म्हणतात–

प्रात्याहिकक्षुत्प्रतिकारवत् तत्प्रतिकारचेष्टवत् पुरुषार्थत्वम् ।

म्हणजे रोज जेवावें व रोज भूक लागते. दृष्ट उपायानें जीव मोक्ष पावला तर क्षुधातृप्ति हाही पुरुषार्थच होईल. मग मोक्षाला जो पुरुषार्थ मानितात तो व्यर्थ होईल. एक वेळ दु:खनिवृत्ति झाली, तर पुन्हा दुःख होऊं नये, हाच खरा पुरुषार्थ होय. म्हणून ईश्वराला पुढेंही बंध



होणार नाहीं. भगवान् म्हणतात–

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥१६॥
(गीता अ. ८)

ब्रह्मभुवनादिक लोक ह्या सगळ्यांना पुनरावृत्ति होते, परंतु माझ्या भक्तांना मात्र पुनरावृत्ति होत नाहीं. तुकाराममहाराजही देवाला अशीच विनंति करितात.

अभंग

समचरण दृष्टि विटेवरी साजिरी ।
तेथें माझा हरि वृत्ति राहो ॥१॥
आणिक नलगे मायिक पदार्थ ।
तेथें माझी आर्त नको देवा ॥२॥
ब्रह्मादिक पदें दुःखाची शिरणी ।
तेथें चित्त झणीं जडों देशी ॥३॥
तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म ।
जें जें कर्मधर्म नाशिवंत ॥४॥

शिष्य :– महाराज, परमेश्वराचे ज्ञानाला त्याला स्वतःला काय उपयोग होतो ?

**ईश्वर दयालुत्व**

गुरु :– मोठे जे असतात ते लोकांच्या हिताकरतांच असतात. वृक्षाचें फळ, नदीचें पाणी, गाईचें दूध ह्यांचा



तो वृक्ष, ती नदी व ती गाय, ह्यांना स्वतःला काय उपयोग आहे ? परंतु त्यांचे ते पदार्थ केवळ दुसऱ्याच्या उपकाराकरितांच आहेत.

सुभाषित–परोपकाराय फलंति वृक्षाः ।
परोपकाराय वहंति नद्यः ।
परोपकाराय दुभति गावः ।
परोपकाराय सतां विभूतयः ।। १ ।।

म्हणून सगळ्यांपेक्षां मोठा जो परमेश्वर त्याच्या ज्ञानाचा उपयोग सर्व जनांवर अनुग्रह करण्याकरितां आहे. वर जे वृक्षादिक पदार्थ सांगितले, त्यांत व परमेश्वरांत दुसरा एक मोठा भेद आहे. वृक्षाची इच्छा नसली तरी लोक त्याला तोडून फळ घेतील. नदीचें पाणी आपल्या इच्छेनें पिऊं शकतील, तसेंच गाईचें दूधही जबरीनें काढू शकतील, परंतु परमेश्वराचे ज्ञान मात्र कोणी म्हणेल कीं जबरदस्ती करून घेतों तर तें मात्र होणार नाहीं. परमात्मा आपल्या कृपेनेंच जीवावर उपकार करितो.

शिष्य :– परमात्मा इतका दयाळू आहे, तर दुष्टांना दंड कां देतो ?

गुरु :– परमात्मा जसा भक्ताला ज्ञान देऊन त्याचा उद्धार करितो तसा दुष्टालाही त्याच्या हिताकरितांच दंड करितो. भक्त आपल्या हिताकरितां देवाची भक्ति करितो; परंतु परमेश्वर मात्र स्वतःच्या हिताकरितां भक्तावर कृपा



करीत नाहीं, तर भक्तावर कृपा करण्याची त्याची स्वयंभूच इच्छा असते. जरी तो दुष्टांना दंड करितो, तरी त्याचे दुर्गुण जावेत म्हणून दयेने दंड करितो. दु:ख व्हावें या हेतूनें शत्रु समजून दंड करीत नाहीं. आईच्या रागावण्यांत मुलाच्या हिताची कळकळ असून अंत:करणांत जसें त्याच्याविषयीं प्रेम असतें तशीच दुष्टाबद्दल परमेश्वराच्या अंत:करणांत त्याला दंड करितांना दया असते. येथें **स्पेन्सरच्या मताचेंही खंडण झालें. स्पेन्सर म्हणतो " न्यायीपणा व दयाळूपणा हे परस्पर विरुद्ध आहेत. "**

शिष्य :– परमेश्वर इतका दयाळू आहे तर त्यानें आह्माला दंड न करितां मागल्या जन्माची आठवण द्यावी, म्हणजे आह्मी पाप करणार नाहीं.

गुरु :– ही शंका शुष्क आहे, हें समजण्याकरितां आपण प्रचारांतलेंच उदाहरण घेऊं. तीन तीन वेळ जेलची शिक्षा भोगलेले जे अपराधी आहेत, त्यांना भोगलेल्या शिक्षेची आठवण असतेच, तरी ते पुन्हां अपराध करितातच. म्हणून ईश्वर हा दयेनेंच दंड करितो.

पापाची वासना जर आपल्याला कमी करावयाची आहे तर ती शास्त्राच्या रीतीनेंच कमी केली पाहिजे. मागच्या जन्माच्या आठवणीनें ती कांहीं कमी होत नाहीं. गाईचें जबरीनें दूध काढिलें असतां, अगर झाडाचें फळ

जबरीनें तोडलें असतां, जसें गाईला दु:ख होतें, किंवा झाड कदाचित् नाश पावतें; तसें ईश्वराला कांहीं दु:ख होत नाहीं, किंवा तो नाशही पावत नाहीं. ईश्वरापेक्षां कमी शक्तीचा कोणीच त्याचा नाश करूं शकत नाहीं. जास्त शक्तीचा कोणी नाश करील असे मानलें तर तोच परमेश्वर. म्हणून परमेश्वराची कृपाही जीवांवर स्वयंभूच आहे. भगवान् म्हणतात–

तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ॥
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥११॥
(गीता–१०)

अज्ञानी जीवावर कृपा करावी म्हणून आपल्या ज्ञानदीपाच्या योगानें मी त्याचें अज्ञान नाहींसें करितों. म्हणून परमेश्वराचे ज्ञानाचा उपयोग दुसऱ्याचे अनुग्रहा-करितांच आहे. तुकाराममहाराज म्हणतात–

॥ अभंग ॥

काय वाणूं आतां न पुरे ही वाणी ।
मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
थोरीव सांडिली आपुली परीसें ।
नेणों शिवो कैसें लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती ।
देह कष्टवीती उपकारें ॥ ३ ॥



भूतांची दया हें भांडवल संतां ।
आपुल्या ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सुख पराचिया सुखें ।
अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ५ ॥ (तु. गा.)

संतांच्या विभूती जर जगाच्या कल्याणाकरितां रात्रंदिवस देह शिणवीत असतात तर सर्व संत ज्याचें भजन करितात त्या परमात्म्याचें ज्ञान, सर्व जीवांचें अनंत जन्मांचें दुःख नाहींसें करील यांत नवल काय ?

याप्रमाणें निर्गुणाचा विचार झाला. व निर्गुण परमात्मा सूत्रांत अशा रीतीनें प्रतिपादन केला आहे.

**आतां हेंच वर केलेलें प्रतिपादन सगुणपर लावून दाखवितात**

भगवान् श्रीकृष्णपरमात्म्याला अविद्याक्लेश कधींच नव्हता. कारण देह हाच आत्मा आहे, असें त्याला कधींच वाटलें नाहीं. अस्मिताक्लेशही त्याला नव्हता. कारण कृष्णदेहापुरतेंच जर त्याचें अनुसंधान असतें, तर अनंत ब्रह्मांडें त्याला आईला दाखवितां आलीं नसतीं. रागक्लेशही त्याला नव्हता. कारण यादवकुळांचा त्यानें स्वतःच नाश केला. त्याप्रमाणें त्याला द्वेषक्लेशही नव्हता. शिशुपाला-दिकांचा जेव्हां त्यानें वध केला, तेव्हां त्यांची ज्योति त्यानें आपल्या शरीरांत मिळवून घेतली. तसाच



अभिनिवेशक्लेशही त्याला नव्हता. गांधारीनें जेव्हां त्याला शाप दिला, तेव्हां 'माते ! या शापाचीच मी वाट पाहात होतो.' असे शब्द त्याच्या तोंडांतून निघाले. यावरून त्याला मरणाची भीतिही नव्हती. दुसरें, प्रयाणकालीं उद्धवाला ज्ञानाचा उपदेश करून ते आनंदानें निजधामास गेले. पुण्यकर्माचीही त्याला बाधा झाली नाहीं. कारण तें त्यांना स्वर्ग देऊं शकलें नाहीं व गोपिकांशीं व्यभिचार वगैरे पापकर्माचीं फळें त्याला मिळालीं नाहींत; व त्यांत (कर्मांत)त्याची वासनाही राहिली नाहीं. हे वर सांगितलेले सर्व प्रकारचे क्लेश भगवान् श्रीकृष्णाला कोणत्याच काळीं झाले नाहींत. म्हणून तो भजनीय आहे. तुकाराममहाराज म्हणतात–

सगुणनिर्गुण दोन्ही ज्याचीं अंगें ।
तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ।। (तु. गा.)

सगुण व निर्गुण हे दोन्ही एकाच परमात्म्याची रूपें आहेत.

श्रीकृष्ण हे सर्वज्ञही होते. त्यांनीं सांगितलेली गीता सर्व शास्त्रांचें मूळ आहे. बरें ! सांदीपनी गुरूजवळून त्यांनीं हें ज्ञान संपादन केलें म्हणावें, तर 'सूर्याला ज्ञान सांगितलें' असें त्यांनीं गीतेंत म्हटलें आहे. म्हणून भगवान् श्रीकृष्ण हे सर्वज्ञ असून स्वत:सिद्ध सर्वांचे (जगाचे) गुरु आहेत. आतां ईश्वर हा जगद्गुरु कसा आहे हें पुढल्या सूत्रानें

सांगतील. (ता. २०-१०-१९०७)

**स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात् ।। २६ ।।**

**ईश्वर सर्व जगाचा गुरु**

गुरु :– मागच्या सूत्रांत सिंहावलोकनन्यायानें ज्ञानाची अवधि ईश्वराच्या ठिकाणीं संपते म्हणून तो सर्वज्ञ आहे असें सांगितलें. म्हणून तोच सर्वांचा गुरु होण्यास योग्य आहे असें अनुमानानें सिद्ध होतें.

न्यायशास्त्रांत ईश्वर जगाचा कर्ता आहे एवढेंच सांगितलें आहे. योगशास्त्रांत ईश्वराचे ऐश्वर्यादि योग चांगले रीतीनें सांगितले आहेत.

यः सर्वज्ञः स सर्ववित् यस्य ज्ञानमयं तपः (मुं. १-१-९)

अशी श्रुति आहे. याचा अर्थ जो सर्वज्ञ आहे त्यालाच सर्व कळतें व असा एक परमेश्वरच आहे. श्रुति म्हणते त्या परमात्म्याचें ज्ञानमय तप आहे. पुन्हां दुसरी श्रुति म्हणते कीं, "स तपस्तप्त्वा" परमेश्वरानें तप केलें.

शिष्य :– परमेश्वराचें तप ज्ञानमयच कां असावें ? तें कर्ममय होऊं शकत नाहीं काय ?

गुर :– परमेश्वराचें तप कर्ममय होऊं शकत नाहीं. कारण त्याला फळ देणारा दुसरा कोणीच नाहीं. त्याचें तप उपासनामयही संभवत नाहीं. कारण त्याच्यापेक्षां बलवान्



कोणीच नाहीं. तर परमेश्वराच्या ठिकाणीं ज्ञानमय तप संभवतें. कारण ज्ञान स्वत:चें स्वत:लाच असतें. ह्या त्याच्या ज्ञानमय तपाचें फळ जीवांचे अनुग्रहार्थ आहे हें मागें सांगितलेंच आहे (पृ. १४). असा हा परमात्मा सर्व जगाचा गुरु होय. जो सर्वज्ञ असतो तोच गुरु होण्यास पात्र असतो. आणि मागचे जे मोठेमोठे आचार्य व गुरु झाले त्यांचा गुरु तो परमात्माच आहे. कारण सर्वज्ञावांचून शब्दप्रमाण पक्कें होत नसतें.

शिष्य :— सर्वज्ञ कोणी आहे हें कोणत्या प्रमाणानें कळतें ?

गुरु :— सर्वज्ञ कोणी आहे हें प्रत्यक्षादि प्रमाणांनीं स्पष्ट दिसत नसलें तरी अर्थापत्तिप्रमाणानें तें कळतें. इतर अल्पज्ञ आहेत म्हणून सर्वज्ञ असा कोणी तरी असला पाहिजे.

स्वामी विवेकानंद म्हणतात,

सर्वज्ञाची कल्पना केल्याशिवाय नीतीचा कित्ता घेतां येत नाहीं.

कोणताही धर्म घ्या, मग तो हिंदु असो, मुसलमान असो, ख्रिस्ती असो; किंवा कोणताही संप्रदाय घ्या; त्यांत **जे ज्ञान झालें तें ईश्वरापासूनच आलें अशी सर्वांची समज आहे.**

बौद्ध ( नास्तिकवादी ), सांख्य व मीमांसक ( हे दोन आस्तिक वादी ) हे तिघे मतवादी खेरीज करून बाकी



सगळे ईश्वर मानतात. चार्वाकाचें मत घ्यावयाचें नाहीं. कारण हे लोकायतिक आहेत. लोकायतिक म्हणजे लोकांना माहित असलेल्या नेहमींच्या प्रपंचरहाटीच्या गोष्टी जसें खाणें, पिणें, वगैरे-त्याच त्यांनीं सांगितल्या आहेत. धर्म त्यांनीं मुळींच सांगितला नाहीं.

बौद्धधर्म हा नास्तिकवादी आहे. या धर्मांतले लोक समजतात कीं, बुद्धाला जें ज्ञान झालें तें ध्यान करितां करितां कोणा एका स्थितींत गेल्यामुळें झालें. जगांतल्या रीतीनें झालें नाहीं हें मात्र खास. बुद्ध म्हणतो, तें ज्ञान मला स्फुरलें. ईश्वरापासून कांहीं झालें नाहीं. असें जरी घेतलें तरी त्याला ज्ञान झालें तें जडापासून झालें नाहीं हें खचित. तर तें चेतनापासूनच झाले असें म्हटलें पाहिजे. ह्या मताचे जे अनुयायी आहेत ते शून्यवादी आहेत, व त्यांना माध्यमिक म्हणतात. त्यांच्या तर्काला हें ज्ञान घेतां आलें नाहीं म्हणून त्यांनीं शून्य आहे असें ठरविलें.

दुसरे काहीं अनुयायी आहेत ते विज्ञानापासून म्हणजे बुद्धीपासून जग उत्पन्न झालें असें मानतात. व दुसरे आणखी कांहीं आस्तिकवादीही आहेत. परंतु बुद्धांनीं नीतीचा सिद्धांतमात्र खरोखर ध्यानाच्या स्थितींतच शोधला. त्यानें ईश्वर हें नांव दिलें नाहीं तरी तो असें म्हणतो कीं, ज्यापासून सर्व ज्ञान येतें असें एक कारण आहे. बुद्ध हा अवतार होता हें मागें सांगितलें आहे म्हणून त्याचें सगळेंच ज्ञान



तर्काचें नाहीं हें खचित्.

आतां जैन म्हणजे आर्हतमत घेऊं. त्यांचा मुख्य जो तीर्थंकर तो स्वयंज्ञानी होता असें ते मानतात. पण सामान्य अधिकाऱ्यांना ते स्वयंज्ञानी मानीत नाहींत. त्यांचें म्हणणें तीर्थंकरालाच फक्त स्वयंज्ञान झालें. व तें जडापासून झालें नाहीं हें मागें ठरलेंच आहे. तर तें चेतनापासूनच झालें असलें पाहिजे. त्याला त्यांनीं परमात्मा असें नांव दिलें नाहीं एवढेंच. परंतु त्यांनीं ईश्वर मानला नाहीं तरी सिद्धांत त्यांच्या गळीं आलाच. जें ज्ञान त्यांना ध्यान करून आलें तें वेदाशीं बहुतेक जुळतें, परंतु त्यांचें तर्काचें ज्ञान मात्र घेण्यासारखें नाहीं.

शिष्य :– यवन धर्मात कोणकोणते धर्म येतात ?

गुरु :– यवनधर्मांत मुसलमान, ख्रिस्ती, हिब्रू वगैरे धर्म येतात. या यवनमताविषयीं शुक्रनीतींत एक श्लोक आहे. तो असा–

ईश्वरः कारणं यत्राऽदृश्योस्ति जगतः सदा ।।

अर्थ– ईश्वर अदृश्य आहे, तो कोणालाच दिसला नाहीं. असा जो परमेश्वर तोच जगाचें कारण आहे. व पापपुण्याच्या समजुती त्यांच्यांत श्रुतिस्मृतिवांचून निरनिराळ्या असतात. बायबल व कुराण यांतही सर्व जगताचें कारण कोणी तरी अदृश्य, अखंड व नित्य आहे, असें सांगितलें आहे. मुसलमान समजतात महम्मद पैगंबराला



परमेश्वराचे शब्द ऐकू आले. ख्रिस्ती लोक मानतात कीं, येशूख्रिस्ताला बापानें ( ईश्वरानें ) ज्ञान सांगितलें. हिब्रू लोक मानतात कीं, मूसा पैगंबराला ईश्वरानें दहा आज्ञा सांगितल्या.या यावनमतांत देखील ईश्वरानेंच ज्ञान सांगितलें असें मानतात.

आतां आर्यमतांतही मीमांसा व सांख्य हे मतवादी ईश्वर न मानणारे आहेत. त्यांत सांख्याची खुबी निराळीच आहे. ते म्हणतात, कपिलाला आपोआपच ज्ञान उत्पन्न झालें. तें चेतनापासूनच झालें असलें पाहिजे. त्याला ते ईश्वर म्हणत नाहीत, एवढेच.

आतां मीमांसक हे कर्मवादी आहेत. त्यांना वेद प्रमाण आहेत. परंतु यांचें म्हणणें एक निरपेक्ष नाद (स्फोट) उठला व तो अर्थयुक्त आहे. यालाच ते वेद म्हणतात. व त्याला अनादि मानतात. श्रुतिप्रामाण्य– 'निरपेक्षोपरव:' उदाहरण– "ईशावास्यमिदं सर्वम्" परंतु हे मंत्र निरर्थक नाहींत. त्यांना अर्थ आहे. शब्द व अर्थ यांचा नित्य संबंध असतो. येथें ही मजा आहे कीं मीमांसक हे वेद मानतात–ते अनादि मानतात, व जीवही अनादि मानतात. परंतु नाद मात्र निरपेक्ष मानतात. पण अर्थवत्ता बुद्धिमत्तेवांचून कशी संभवेल ? म्हणून बुद्धिमान असा कोणीतरी असला पाहिजे. ह्या मतापुरते यवनच यांच्याहून उंच आहेत. कारण ते ईश्वर मानतात. परंतु यवनांचें मत



आर्यमतापेक्षां मात्र उंच नाहीं. जडापासून वेद आले व ते अर्थयुक्त आले हें म्हणणेंच संभवत नाहीं म्हणून ईश्वरापासूनच वेद आले हें म्हणणें योग्य दिसतें. निदान जगाच्या बाहेरून तरी वेदाचें ज्ञान आलें असें मानावें लागतें. सांख्यांतही कपिल स्वयंज्ञानी होते असें मानतात.

सारांश, सर्वज्ञ असा कोणी तरी घेतल्याशिवाय कोणत्याच धर्मांत सोय लागत नाहीं.

**ज्ञानदाता ईश्वरच**

आतां संप्रदायाकडे वळूं. अर्वाचीन संप्रदायांत नाथ, आनंद वगैरे आहेत. यांत नाथ संप्रदायांतील पुरुष आदिनाथापासून ज्ञान आलें असें समजतात व आदिनाथ म्हणजे शंकर यांना ज्ञान कसें आलें हा प्रश्न यांना मुळींच नाहीं. कारण शंकरालाच ते ईश्वर समजतात. दुसरे संप्रदायी आदिनारायणालाच आदिगुरु मानून तोच सर्वज्ञ ईश्वर आहे असें मानतात.

अलीकडचे आनंदमार्गी लोक दत्तात्रेयाला गुरु मानून त्याला स्वयंसिद्ध ज्ञान होतें व तेथून हें ज्ञान प्रगट झालें असें म्हणतात. मानभाव म्हणतात, परमेश्वरापासूनच हें ज्ञान प्रगट झालें. वल्लभसंप्रदायी म्हणतात, कीं विष्णुस्वामीला परमेश्वरानें ज्ञान दिलें. रामानुजसांप्रदायी रामानुजाला परमेश्वरानें ज्ञान दिलें असें मानतात.



चैतन्यसांप्रदायी कृष्णचैतन्य हा श्रीकृष्णाचा अवतार असून स्वयंज्ञानी होता असें मानतात. माध्वसांप्रदायी ईश्वरापासूनच ज्ञान आलें असें मानतात. निंबार्काला ईश्वर प्रसन्न होऊन त्यानें ज्ञान दिलें असें निंबार्कसंप्रदायी म्हणतात. शांकरमतानुयायी हे सर्वांचा गुरु आदिनारायण किंवा आदिनाथ असून दोघेही एकच आहेत व तेच ईश्वर आहेत असें मानतात. मुकुंदराजांनीं विवेकसिंधूच्या शेवटल्या अध्यायांत ईश्वरच गुरु आहे व सर्वज्ञ आहे असें म्हटलें आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनींही आपली परंपरा सांगतांना आदिनाथ शंकरापासूनच हें ज्ञान प्राप्त झालें असें म्हटलें आहे. ती ओवी–

क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं ।
नेणों कें श्रीत्रिपुरारी । सांगितलें जें ॥१७५२॥ (ज्ञा. १८)

येथें तें ज्ञान केव्हां सांगितलें तो काल मात्र दिला नाहीं. तुकाराममहाराजांचे पूर्वज विश्वंभरबाबा यांना पांडुरंगानें प्रत्यक्ष येऊन नामाचा उपदेश केला असें तुकारामचरित्रांत म्हटले आहे. या (चैतन्य) सांप्रदायांत ईश्वरापासून ज्ञान झालें आहे असें मानतात.

आतां ब्रह्मसूत्राचे जे भाष्यकार आहेत त्यांच्याबद्दल विचार करूं–वल्लभाचार्यांचें अणुभाष्य, गोविंद व भिक्षु यांचें भाष्य, रामानुजांचें श्रीभाष्य, शांकरभाष्य, बोधायनवृत्ति, लघुभाष्य, पूर्णप्रज्ञभाष्य व निंबार्कभाष्य या सगळ्यांचा वेदावर



विश्वास पूर्ण असून वेदांना ते ईश्वरप्रणीत मानतात. वेदाचें ज्ञान भ्रमरूप कधींही नसतें. इतरांचें ज्ञान भ्रमरूप असतें. आतां आगमाचा विचार करूं–

पंचरात्रागम विष्णूनें सांगितला आहे. शाक्तागम शिवांनीं सांगितला आहे. तसाच सौरागम सूर्याचा आहे. या तिन्हीही आगमांत ईश्वरापासून ज्ञान आलें असें म्हटलें आहे.

आतां अति जडवादी म्हणतात कीं, जगाचें कारण अज्ञेय आहे. त्यांच्या म्हणण्याचा अर्थ असा कीं, तें कारण जड आहे किंवा चेतन आहे हें माहीत नाहीं. परंतु जगाची उत्पत्ति अज्ञेय कारणापासूनच होते तर मग त्यांच्या म्हणण्याप्रमाणें ज्ञानही तेथूनच झालें पाहिजे. आणि तें कारण जड म्हणजे अज्ञानमय मानलें तर त्यापासून ज्ञानाची उत्पत्तिही संभवत नाहीं. यावरून अनुमानानें असें ठरतें कीं, ज्ञान चेतनापासून म्हणजे ईश्वरापासूनच आलें पाहिजे. सर्व धर्मसमजुतीही अशाच आहेत. भेद इतकाच कीं, कोणी कुराण ईश्वरप्रणीत मानतील तर कोणी पुराण ईश्वरप्रणीत मानतील. मग तें खपो कोण्याही रूपानें. पण ज्ञान ईश्वरापासूनच येत असतें ही मात्र सगळ्यांचीच समजूत आहे. मग इतर धर्मसमजूतींत ते आपसांत भांडतील ही गोष्ट निराळी.

इतिहासाच्या दृष्टीनेंही वेद हे सर्वांच्या पूर्वीचे



आहेत. यावरून निदान वेदच ईश्वरानें सर्वांच्या पूर्वी केलें हें सिद्ध होईल. वेद व पुराण एकच. व्यासांनीं वेदाच्या चार शाखा केल्या. तशींच पुराणेंही १८ केलीं आहेत. मत्स्यपुराणांत म्हटलें आहे-

कालेनाग्रहणं मत्वा पुराणस्य द्विजोत्तमाः ।
व्यासरूपमहं कृत्वा संहरामि युगे युगे ॥

वेदाच्या उत्पत्तीनंतर कांहीं काल गेल्यावर लोक पूर्वीप्रमाणें पुराणांचें ग्रहण करणार नाहींत म्हणून युगायुगाचे ठिकाणीं मी व्यासरूप धरून पुराणांचें स्थापन करितों (असें भगवान् म्हणतात). वेदांतही पुराण व इतिहास शब्द आले आहेत. शंकराचार्यांनीं पुराण इतिहास याचा अर्थ भारतादिक असा केला आहे. वेद व पुराण हे ईश्वरप्रणीत आहेत. सर्व धर्मांचें ज्ञान जगांतल्या जीवांना येणें शक्य नाहीं. तर ज्याला सगळें ज्ञान आहे असा कोणी तरी जगाहून निराळा असला पाहिजे व सर्व धर्मसमजूतीही अशाच आहेत. म्हणून आपल्यापेक्षां कोणी तरी मोठा (वरिष्ठ) असलाच पाहिजे. व आपल्यांपेक्षां जो कोणी श्रेष्ठ असेल त्याचें कर्म व संज्ञा हें लक्षण आहे.

वैशेषिकांत म्हटलें आहे कीं-

संज्ञा कर्मत्वस्मद्विशिष्टानां लिंगम् ॥

आमच्यापेक्षां वरीष्ठ ज्ञानाचे जे पुरुष आहेत त्यांचें लिंग म्हणजे अनुमापक कर्म आणि संज्ञा हे होत. अमक्या



औषधीनें अमका रोग जातो असें कोणी सांगितलें किंवा मंत्रानें सर्पविष उतरतें असें सांगितलें किंवा ग्रहशांतीनें पीडा निवारण होते, वगैरे वगैरे हे अनेक शास्त्रांतले सिद्धांत ज्यांनीं सांगितले त्यांना स्वतः ते औषधी, मंत्र वगैरे स्वतःच्या स्फूर्तीनें आले पाहिजेत, अगर ज्यांना ते तशा स्फूर्तीनें कळले त्यांजपासून मिळाले पाहिजेत. तर हे औषधादिक उपाय हें कर्म, व मंत्र वगैरे प्रयोग या संज्ञा ज्यांना कळल्या असे आपल्यापेक्षां कोणी विशिष्ट असले पाहिजेत. व त्यांना अनुभवानें किंवा स्फूर्तीनें तें ज्ञान असलें पाहिजे. किंवा त्यांनीं उद्योगाने तें मिळविलें असें घेतलें तरी जगांच्या कल्याणासाठींच त्यांनीं तें मिळविलें असल्यामुळें इतरांपेक्षां ते बुद्धीनें श्रेष्ठ होत असें ठरतेंच. म्हणून कर्म व संज्ञा हें वरिष्ठाचें लक्षण होय.

म्हणून श्रेष्ठांनीं जें सांगून ठेविलें आहे कीं, ब्रह्मज्ञान हेंच श्रेष्ठ आहे व तें मिळविण्याला विषय सोडले पाहिजेत; कारण विषयांत सुख नाहीं-हें त्यांचें वचन आपण प्रमाण मानलें पाहिजे.

शिष्य :- जसे आपण विषय भोगतों तसे त्यांनींही भोगले, मग त्यांचें वचन प्रमाण कां मानावें ?

गुरु :- अरे, त्यांनीं विषय भोगले तरी त्यांत सुख नाहीं हें पाहून विषय सोडून दिले. यावरून ते विषयासक्त नव्हते. कारण जारपुरुष जारकर्मांत सुख नाहीं असें कधीं



सांगत नाहीं, पण श्रेष्ठ हे आपल्यास विषयांत सुख नाहीं, ते सोडावे असें सांगतात. यावरून ते विषयासक्त नव्हते. ते ब्रह्मज्ञान मिळविण्याच्या कामांत फार तत्पर राहिले. आळशी नव्हते. आळशी असते तर दुसऱ्यांनीं आम्हांला द्यावें असें सांगून दानाचेंच महत्त्व वर्णन केलें असतें. ब्रह्मज्ञान श्रेष्ठ आहे असें त्यांनीं कधींच सांगितलें नसतें. दुसऱ्याकडून दानधर्म घेऊन आपण स्वस्थ बसून खाणारे झाले असते. त्यांनीं ज्याअर्थीं विषय सोडण्याला आपणास सांगितलें त्याअर्थीं त्यांचें विषय निवृत्त झाले होते खास.

कांहीं लोक स्वत: चांगले आचरण करीत नाहींत; परंतु दुसऱ्याला सत्कर्माचा उपदेश करितात. असे लोक सुद्धां श्रेष्ठ पुरुषांचीं बचनें ऐकून तीं लोकांना सांगत असतात. परंतु ज्यांनीं तीं वचनें शोधून काढलीं तेसुद्धां वरिष्ठ असले पाहिजेत. तुकाराममहाराज म्हणतात, ज्यांना विषयाची चाड नसते, अशा संतांचेंच वचन मानावें. न्यायकुसुमांजलिकार उदयनाचार्य म्हणतात–

सापेक्षत्वादनादित्वाद्वैचित्र्याद्विश्ववृत्तित: ।
प्रत्यात्मनियमाद्भक्तेरस्ति हेतुरलौकिक: ॥

याचा भावार्थ असा कीं, हें जग विचित्र आहे व तें वैचित्र्य उपयोगाचेंही आहे. विषयांत सुख नसून विषय नाश पावणारे आहेत. परंतु जीवांची उडी विषयावरच आहे. व बिषयांची त्यांना इच्छाही असते. ह्याचें कारण

त्यांची सुखाकडे असणारी प्रवृत्ति होय. परंतु मजा ही असते कीं, विषय व विषयसुखाची इच्छा या दोन गोष्टींत विषय नाश पावतात व सुखाची इच्छा मात्र तृप्त होत नाहीं. ह्यावरून विषयांच्या पलीकडे निर्विषय सुख असलें पाहिजे हें त्यांना कळत नाहीं.

जगांतल्या कोणत्याही गोष्टीला कारणाची अपेक्षा आहे. व तें कारण अनादि असलें पाहिजे. व जगांत विचित्रता आहे म्हणून कारण असलें पाहिजे. आकाश पोकळ आहे, व पृथ्वी भरीव आहे; हें जाणणारा कोणी तरी पाहिजे. व ही विचित्रता उपयोगी आहे हें बुद्धिमत्ते-शिवाय कळणार नाहीं. म्हणून कांही तरी अलौकिक शक्ति ही जगाचें कारण असली पाहिजे हें ठरतें. व अनेक धर्माचे जे प्रवर्तक होऊन गेले त्या सर्वांच्या समजुतीही अशाच आहेत. आणि त्या कांहीं खुळचा (खोटचा) नाहींत. मोरोपंत म्हणतात–

तुझ्या बहुत शोधिले अघनिधो पदाच्या रजें ।
न ते अनृत वर्णिती बुधजनीं सदाचार जे ।।
असें शत न एक ते सतत बोलती मीच ते ।
प्रमाण न म्हणों जनीं उचित माझियां नीचते ।। ३ ।।

(केका.)

श्वेताश्वतरोपनिषदांत अशी एक कथा आहे–

किं कारणं ब्रह्म कुतः स्म जाता जीवाम केन क्वच संप्रतिष्ठाः।

अधिष्ठिताः केन सुखतरेषु वर्तामहे ब्रह्मविदो व्यवस्थाम् ॥१॥
(श्वे. अ. १)

सर्व ऋषीनीं एके ठिकाणीं बसून आपसांत शोध चालविला कीं, आम्ही कोण ? कोठून आलों ? आम्हांला सुखदुःखांत कोण घालतो ? व ह्या सर्व जगाचें कारण काय असावें ?

ते म्हणाले–

कालस्वभावो नियतिर्यदृच्छा भूतानियोनिःपुरुष इति चिन्त्यम्।
संयोग एषां नत्वात्मभावादात्माप्यनीशः सुखदुःखहेतोः ॥२॥

म्हणजे काल, स्वभाव, नियति, यदृच्छा इत्यादि मंडळीपैकी एकही जगाचें कारण होण्याला योग्य दिसत नाही. काल जर कारण म्हणावा तर मेला मनुष्य काल कांहीं जिवंत राहू शकत नाहीं. स्वभाव जर कारण मानला तर तो कालावांचून राहू शकत नाहीं. नियति म्हणजे पूर्व कर्म जर कारण मानलें तर कर्म हें जड आहे; कारण फल देणारा दुसरा कोणी पाहिजे. यदृच्छा म्हणजे कोण्यातरी रीतीनें जग होत असेल असें जर कारण मानलें तर मरण व जन्म हे एकदम झाले पाहिजेत. पंचमहाभूतें म्हणजे सांख्यांची प्रकृति कारण मानली, तर ती जड आहे. या सर्वाचा संयोग कारण मानला, तर संयोग हा दुसऱ्याच्या उपयोगाकरितां असतो; स्वतःला त्याचा कांही उपयोग नसतो. याला प्रमाण " संघातपरार्थत्वात् " हें वचन आहे.



आत्मा म्हणजे जीव जर कारण मानला तर त्याला सुख-दु:ख होतें, म्हणून तो अनीश आहे. अशा प्रकारें कोणतेंच त्यांना जगाचें कारण समजेना, तेव्हां-

ते ध्यानयोगानुगता अपश्यन्देवात्मशक्ति स्वगुणैर्निगूढाम् ।
य: कारणानि निखिलानि तानि
कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येक: ।।३।। (श्वे. १)

या श्रुतींत सांगितल्याप्रमाणें त्या सर्व ऋषींनीं ध्यान करून पाहिलें असतां, त्यांना असें दिसून आलें कीं, वर काल, जीव वगैरे पदार्थ सांगितले, त्या सर्व कारणांचेंही कारण कोणी तरी ईश्वर आहे. त्याच्या शक्तीनेंच हें सर्व जगत् चाललें आहे. सारांश, सर्व धर्मसंस्थापक ध्यानयोगानेंच ईश्वर पाहतात व ईश्वर त्यांना आज्ञा देतो, व त्याप्रमाणें ते धर्माची स्थापना करितात.

विवेकानंदही म्हणतात कीं, "सर्व धर्मांच्या प्रवृत्ति ध्यानयोगापासूनच प्रगट होत आल्या. पण त्या प्रवृत्ति पाश्चात्य देशांत प्रचारांत नाहींत."

वेदांत मात्र त्या आहेत. सांख्यांत २५ तत्त्वें मानून कपिल हे स्वत:सिद्ध ज्ञानी होते असें मानलें आहे. योगांतही सांख्यांप्रमाणेंच पंचवीस तत्त्वें मानलीं असून २६ वा ईश्वर मानला आहे. कारण ईश्वर मानल्याशिवाय जगाचें ज्ञानच होणें शक्य नाहीं. वैदिकमताप्रमाणें ब्रह्मा, विष्णु, महेश हे सर्वांहून वरिष्ठ आहेत.



विज्ञानभिक्षु म्हणतात- तो परमेश्वर ब्रह्माविष्णु-महेशांचा देखील गुरु आहे

पण हें मत मला बरोबर वाटत नाहीं. ब्रह्मदेवाला ईश्वरत्व व जीवत्व दोन्ही आहेत. श्रुतींत हिरण्यगर्भाला भूक लागली असतां तो विराटाला खावयास धांवला तेव्हां विराट भ्याला, अशी कथा आहे. क्षुधा व भय हे जीवाचे धर्म आहेत. ब्रह्मदेवाला भोगावर अभिमान असतो, तेव्हां तें जीवधर्माचें द्योतक आहे व जगत्कारित्वाच्या नात्यानें उपासना सांगितली ती ईश्वरधर्माची द्योतक आहे. हिरण्यगर्भावरही परमेश्वराची भावना करावी असें निरूपण आत्मपुराण व वृत्तिप्रभाकर यांत केलें आहे. तसेंच आकाश हें जड आहे, त्याच्या व्यापकत्वामुळें आकाशावर ईश्वराची भावना सांगितली आहे. अपय्या दीक्षित शिवतत्वविवेकांत म्हणतात-

क्वचित्कल्पे वेधाः क्वचिदपि हरिः क्वापि च हरः ।

एखाद्या कल्पांत ब्रह्मदेव पूर्वी उत्पन्न होऊन तो शिव व विष्णूस उत्पन्न करितो. एखाद्या कल्पांत शिव प्रथम उत्पन्न होतात व ते ब्रह्मदेव व विष्णु यांस उत्पन्न करितात. एखाद्या कल्पांत विष्णु प्रथम उत्पन्न होऊन नंतर ब्रह्मदेव व रुद्र यांना उत्पन्न करितात. असे हे तिघेजण कल्पाकल्पाचे ठिकाणीं परस्पर उत्पादक होतात, म्हणून वेदाचे जाणणारे या तिघांत भेद मानीत नाहींत.



अद्वैतकौस्तुभांत (तत्वानुसंधानाची टीका) ईश्वरच त्रिमूर्ति धारण करितो असें म्हटलें आहे. जगत्-कल्याणासाठीं परमेश्वर सृष्टि चालविण्याकरितां एक व भक्तांकरितां एक एक अशीं दोन रूपें घेतो. तसेंच ब्रह्मा, विष्णु, महेश हेही दोन प्रकारचीं रूपें धरणारे आहेत. म्हणजे ब्रह्मदेव सृष्टि उत्पन्न करितो-विष्णु पालन करितो व शंकर संहार करितो. उत्पत्ति करितो म्हणून ब्रह्मदेव रजोगुणी, पालन करितो म्हणून विष्णु सत्वगुणी, व संहार करितो म्हणून शंकर तमोगुणी असें म्हटलें आहे. हीं रूपें व गुण फक्त सृष्टिकार्याकरितां आहेत. उपासनेकरितां रूपें जरी तीन सांगितलीं तरी उपासना मात्र सत्वगुणाचीच सांगितली आहे. उपासनेंत तिन्ही देवांचीं शरीरें सत्वगुणी असतात. महिम्नांत म्हटलें आहे

तथापि स्मर्तॄणां वरद परमं मगलमसि ।।

जरी शंकर स्मशानांत राहतात तरी गावांत वैराग्य होत नाहीं म्हणून लोकांना वैराग्याचा बोध व्हावा या हेतूनें राहतात. वास्तविक ते भक्तांना परम मंगल व सत्वगुणी आहेत.

शिष्य :– महाराज, सूतसंहितेंत विष्णूस तमोगुणी म्हटलें आहे व शंकरास सत्वगुणी म्हटलें आहे, भागवतांत विष्णूस सत्वगुणी व शिवास तमोगुणी म्हटलें आहे. शिव-पुराणांत विष्णूची निंदा केली आहे, व विष्णुपुराणांत



शिवाची निंदा केली आहे. हे जे परस्पर निंदास्तुतीचे प्रकार दिसतात त्यांची संगति कशी ?

**पुराणांत शिव विष्णु निंदा कार्यब्रह्मदृष्टीनें**

गुरु :– सूतसंहितेंत व भागवतादि पुराणांत परस्पर शिवाची व विष्णूची जी निंदा आढळते ती केवळ त्या त्या देवाची कार्यब्रह्म या नात्यानें म्हणजे जीव समजून निंदा केली आहे. व उपासनेचा ईश्वर म्हणजे कारणब्रह्म या दृष्टीनें स्तुति केली आहे. वरील ग्रंथांत एकमेकांची जी निंदा आहे ती कांहीं वास्तविक नाहीं. उपासनेकरितां मात्र प्रत्येक पुराणांत सत्वगुणच सांगितला आहे, व सृष्टिकार्या-करितां तीन गुण म्हणजे ब्रह्मा रजोगुणी, विष्णु सत्वगुणी व शंकर तमोगुणी हे सगळ्यांत सारखेच सांगितले आहेत.

**शंकर, ब्रह्मा, विष्णु गुणचालक**

आतां शंकराला तमोगुणी म्हटलें आहे त्याचा अर्थ, तो तमोगुणाच्या स्वाधीन आहे असा नाहीं. तर तमो-गुणी म्हणजे सर्वांना रोज निद्रेंत व प्रलयकालीं महानिद्रेंत टाकण्याकरितां तमोगुणाचा चालक या अर्थानें तमोगुणी म्हटलें आहे. तसा विष्णु हा सत्वाचा व ब्रह्मा रजोगुणाचा चालक आहे. असे हे तिन्ही देव गुणांच्या स्वाधीन नसून गुणांचे चालक या नात्यानें गुणातीतच आहेत. म्हणजे



ब्रह्मरूप आहेत. व भक्तांना उपासनेसाठीं सत्वगुण देणारे आहेत. या प्रकारचा श्रुतीनें वर्णन केलेला परमेश्वर हिरण्यगर्भाचे ठिकाणीं आहे, असें घेऊन चाललें तर त्या हिरण्यगर्भाला जीवधर्म सांगितले आहेत म्हणून ब्रह्मदेवाला ज्ञान होण्याला ईश्वराची अपेक्षा आहे. व ईश्वरानें ब्रह्मदेवाला उपदेश केला असें सांगितलेंही आहे. परंतु शंकर व विष्णु यांना मात्र गुरूच्या अपेक्षेवांचून ज्ञान होतें. महाभारतांत म्हटलें आहे कीं–

रुद्रो नारायणश्चैवेत्येकं सत्वं द्विधा कृतम् ।
लोके चरति कौंतेय व्यक्तिस्थं सर्वकर्मसु ।।

हे अर्जुना, रुद्र व नारायण ह्या ज्या दोन व्यक्ति आहेत तें एक सत्वच दोन्ही ठिकाणीं वांटून लोकानुग्रहासाठीं व्यक्तिस्थ होऊन एक नारायणरूपानें व एक शंकररूपानें त्रैलोक्यांत सर्व कर्मांचे ठिकाणीं हें ब्रह्मच सगुणरूपानें विचरत आहे. यावरून शंकर व विष्णु हे ईश्वर असल्यामुळें यांना गुरूशिवायच ज्ञान होतें. व शिवाचा व विष्णूचा कोणी गुरु होता असें पुराणांत सांगितलेलें दिसत नाहीं. आतां त्यांचा जो परस्पर गुरुशिष्यभाव दिसतो, तो केवळ लीलामात्र आहे. श्वेताश्वतरउपनिषदांत अशी श्रुति आहे कीं–

यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ।



तँहदेवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ।।
(श्वे. ६-१८)

जो ब्रह्मदेवाला प्रथम उत्पन्न करून त्याला वेद (ज्ञान) देता झाला त्या सर्व रक्षण करणाऱ्या व आत्मप्रकाश देणाऱ्या देवाला मी मुमुक्षु नमस्कार करितों. यांत विष्णु हा ब्रह्मदेवाचा गुरु आहे असें म्हटले आहे. परंतु ब्रह्मदेवानें शंकराला किंवा विष्णूला ज्ञान दिलें असें श्रुतींत व पुराणांत कोठेंच दिसत नाहीं. म्हणून ब्रह्मदेवापासून संप्रदाय कोणताच सुरू झालेला नाहीं, असें श्रुतीतच दिसतें. व आदिनाथ आणि आदिनारायण यांना संप्रदायाकरितां एकमेकांची जरूर लागली नाहीं हें भारतावरून दिसतें. ह्यावरून विज्ञानभिक्षूचें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. कारण श्रुति व भारत यांच्या म्हणण्याच्याविरुद्ध आहेत.

शिष्य :– महाराज, एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, हिरण्यगर्भ हा समष्टिजीव असल्यामुळें शिवाचे व विष्णूचे उपासक जीव ब्रह्मलोकांस जातात व तो ब्रह्मलोकच त्यांना शिवलोक, विष्णुलोक किंवा ब्रह्मलोक अशा निरनिराळ्या रूपानें दिसतो. हें म्हणणें बरोबर आहे काय ?

गुरु :- हें म्हणणें अर्चिरादि मार्गानें जाणाऱ्या उपासकाविषयीं आहे. भक्ताविषयीं नाहीं. कारण 'तद्विष्णोः परमं पदम्' इत्यादि श्रुति असें सांगतात कीं, जीव जसा उपासनेनें ब्रह्मलोकास जातो तसाच तो विष्णुलोक व



शिवलोक येथेंही स्वतंत्रतेनें जातो व गमनागमन श्रुतिवरूनच जाणलें पाहिजे. येथें अनुमानापेक्षां शाब्दप्रमाणच ग्राह्य आहे. अस्तु.

प्रारंभीच्या सूत्रांत 'स' आणि 'एष' हीं दोन विशेषणें आहेत. स म्हणजे तो व एष म्हणजे हा. तो ह्यावरून दूरचा व हा म्हणजे जवळचा पदार्थ असा बोध होतो. वरील सूत्रांत सः–तो-म्हणजे या सर्व ब्रह्मांडाचा चालक परमात्मा तो. एष म्हणजे आपल्या हृदयांतही (जवळच) तोच राहून स्फूर्ति देणारा आहे. असा परमात्मा दुरून ज्ञान देतो असें नाहीं, तर आपल्या हृदयांत त्याचें ध्यान केलें म्हणजे तो आपल्यास स्फूर्ति देतो. कारण तो जवळच आहे. म्हणून तोच हा परमात्मा 'पूर्वेषां' म्हणजे ब्रह्मादिकांचा व कश्यपमरीच्यादिक प्रजापतींचाही गुरु आहे. 'कालेनानवच्छेदात्' तो कालाचे योगानें अनविच्छन्न म्हणजे बांधलेला नाही. परमेश्वर एव्हां उत्पन्न झाला, एव्हां त्याचा नाश होईल, असें कोणी पाहणारा नाहीं. कोणी पाहणारा असेल तर त्यालाच आम्हीं परमेश्वर म्हणूं. म्हणून तोच सर्वांचा गुरु होय. परमेश्वराला उत्पत्तिनाश नसल्यामुळें त्याच्यावर काळाचा परिणाम घडत नाहीं. भगवान् गीतेंत म्हणतात–

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।



भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ।।
(गीता १८-६१)

अहं कृत्स्नस्य जगत: प्रभव: प्रलयस्तथा ।
मत्त: परतरं नान्यत् किंचिदस्ति धनंजय ।।
(गीता ७-७)

या गीतेंतील श्लोकांचा व वरील योगसूत्राचा चांगला मेळ पटतो. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

म्हणोनि ईश्वर गोसावी । तेणें प्रकृति हे नेमावी ।।
तिया मुखें राबवावी । इंद्रियें आपुलीं ।।
(ज्ञा. १८-१३१७)

भागवतांत म्हटलें आहे की,

नष्टे लोके द्विपरार्धावसाने महाभूतेष्वादिभूतं गतेषु ।
व्यक्तेऽव्यक्तं कालवेगेन याते भवानेक: शिष्यते शेषसंज्ञ: ।।

परसंख्या ही ब्रह्मलोकांत चालते. दोन परार्ध म्हणजे एक पर; इतका काल गेल्यावर जगत् नष्ट होतें. तेव्हां महाभूतें आदिभूतांत लय पावतात. तीं आदिभूतें अव्यक्तांत लय पावतात. अव्यक्त मायेंत (प्रकृतींत) लीन होतें. व प्रकृति ईश्वरांत लय पावते. त्यावेळेस तूं ज्याला उपासक शेष असें म्हणतात– किंवा अशेष म्ह. सर्वदां पूर्ण–असा तूं परमात्मा उरतोस. या श्लोकावरून प्रलयांत परमात्म्याचें ज्ञान जागृत असतें असें दिसतें.



व वृत्तिप्रभाकरांत जें म्हटलें आहे कीं, ईश्वराचें ज्ञान सृष्टिकालीं उत्पन्न होतें व प्रलयकालीं नष्ट होतें आणि पुन्हा सृष्टि होण्याचे वेळीं उत्पन्न होतें त्याचेंही खंडण या श्लोकानें झालें. गीतेंतही असेंच वचन आहे–

सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदु: ।
रात्रीं युगसहस्रां तां तेऽहोरात्रविदो जना: ।।
(गीता –८–१७)

म्हणजे हजारयुगेंपर्यंत ब्रह्मदेवाचा दिवस असतो. तेव्हां तो उत्पत्ति करितो व हजार युगांनंतर जगाचा प्रलय होऊन ब्रह्मदेवाची रात्र होते. ती रात्रही हजार युगांची असते. ती रात्र संपली म्हणजे ब्रह्मदेव पुन्हां जागृत होऊन सृष्टिकार्य आरंभ करितो. ही जी कालाची गणना आहे ती करणारा कोणी तरी असला पाहिजे. कारण दोन परार्ध काल संपल्यानंतर जेव्हां महाप्रलय होतो, त्या प्रलयांत जर ईश्वराचें ज्ञान नष्ट झालें, तर गणना करणार कोण ? व पुन: जगाची उत्पत्ति करणार कोण ?

जगाची उत्पत्ति जीवांच्या कर्मानुसार मानावी तर ती जडांतून मानावी कीं चेतनांतून मानावी ? जडांतून उत्पत्ति मानतां यावयाचीच नाहीं. आतां राहिलें चेतन त्यांतून उत्पत्ति मानली तर मग ईश्वराचें ज्ञान नष्ट होत नाहीं हें आयतेंच ठरलें. यावरून प्रलयकालांतही त्य



ठिकाणीं परमात्मा राहतो हें गीता आणि भागवतावरून सिद्ध होतें.

भाष्यकारांचेंही म्हणणें असेंच आहे. ते म्हणतात– या कल्पांत जसें ईश्वराचें ज्ञान कायम असतें, तसेंच तें कल्पाकल्पाचे ठिकाणींही जागृत असतें. आपलाही निद्रेचा अनुभव असाच आहे. वासना ही आधींच जड आहे. ती झोपेंत लीन झाल्यावर वेळेवर उठण्यास समर्थ कशी होईल ? झोपेंत ती स्वत: असमर्थ असते. तर परमेश्वरच तिला उठवितो. हा जर आपला रोजचा निद्रेचा अनुभव आहे, तर मग महानिद्रा जो प्रलय तेथेंही तो परमात्मा जागृत राहून वासनेस उठवितो हेंच सिद्ध होतें. नित्य प्रलयांत सर्व गोष्टी आठवण ठेवण्याला वासना ही समर्थ असते, परंतु महाप्रलयांत त्या समर्थ वासनेलाही आठवण राहत नाहीं. म्हणून परमेश्वरच उत्पत्तिकालीं तिचें पुनरुत्थान करितो. या रीतीनें श्रुति, युक्ति व अनुभव यांनीं असें सिद्ध झालें कीं, परमात्मा प्रलयांत जागृत राहतो.

**भक्ति ही ईश्वराच्या कृपेनेंच उत्पन्न होते**

योगवासिष्ठांत म्हटलें आहे कीं,

> यावन्नानुग्रह: साक्षाज्जायते परमेश्वरात् ।
> तावन्न सद्‌गुरु: कश्चित् सच्छास्त्रामपि नो लभेत् ।।



म्हणजे जोंपर्यंत साक्षात् परमेश्वराचा अनुग्रह आपल्यावर होत नाहीं तोपर्यंत सद्गुरु किंवा सच्छास्त्र यांपैकीं कोणाचाच लाभ होत नाहीं. अवधूतगीतेंतही असेंच म्हणतात.

ईश्वरानुग्रहादेव पुंसामद्वैतवासना ।

मनुष्याला ईश्वराच्या अनुग्रहानेंच अद्वैतवासना उत्पन्न होते. तशीच भक्तिही त्याच्याच कृपेनें उत्पन्न होते. भगवान् नारद म्हणतात–

मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा ।

असा हा परमात्मा सर्वांचा गुरु आहे. त्याचें ज्ञान सर्वकालीं जागृत राहतें. मुक्तजीवांचे जसे विदेहमुक्त व जीवन्मुक्त असे दोन भेद आहेत, तसा परमेश्वर हा नित्यमुक्त आहे. तो परमात्मा नित्यमुक्त असून मुक्तजीव हे त्याच्यांत मिळतात, म्हणून तो त्यांच्याहीपेक्षां श्रेष्ठ होय.

**मुक्तजीवांपेक्षां परमेश्वर श्रेष्ठ**

मुक्तजीवापेक्षां परमेश्वर श्रेष्ठ कसा तें सांगतो– मुक्तजीवांना गुणातीत म्हटलें आहे व भगवद्गीतेंत,

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ।।

(गीता १४–२२)



असे गुणातीताचें लक्षण केलें आहे. प्रकाश म्हणजे ज्ञान, हें सत्वगुणाचें कार्य, प्रवृत्ति हें रजोगुणाचें कार्य आणि मोह होणें हें तमोगुणाचें कार्य; अशा या तीन गुणांमुळें निरनिराळ्या इच्छा उत्पन्न झाल्या असतां ज्ञानी त्यांचा द्वेष करीत नाहीं व त्या इच्छा निवृत्त झाल्या तर त्यांची अपेक्षाही करीत नाहीं. यावरून ज्ञान्याला म्हणजे मुक्ताला तिन्ही गुणांच्या वृत्ति उत्पन्न होणें चुकत नाहीं, परंतु परमात्म्याला मात्र हे धर्म केव्हांच उत्पन्न होत नाहींत. सृष्टिकालीं जेव्हां उत्पन्न होतात तेव्हां तो त्यांचा चालक असतो. म्हणून श्रुतींत **उपासना ईश्वराचीच सांगितली आहे.** मुक्तजीवांची सांगितली नाही. मुक्तजीव आणि परमेश्वर हे आत्मदृष्टीनें जरी एक असले, तरी जीवदृष्टीनें ते एक नसल्यामुळें भक्तीकरितां त्यांना ईश्वराचीच अपेक्षा आहे. व असें श्रुतिवचनही आहे.

यं सर्वे देवा नमंति मुमुक्षवो ब्रह्मवादिनश्च ।

म्हणजे तो ईश्वर सामर्थ्यवान् असल्यामुळें सर्व देव त्याला नमस्कार करितात, मुमुक्षु ज्ञान होण्यासाठीं त्याला भजतात व ब्रह्मनिष्ठ मुनी हे त्याची निरपेक्ष भक्ति करितात.

शिष्य :– परमेश्वराचा अवतार नुसता सत्वगुणीच नाहीं तर तमोगुणीही आहे; कारण तो जसें भक्तांचें रक्षण करितो तसा दुष्टांना मारतोही. तर दुष्ट हे तमोगुणी



असल्यामुळें त्यांना मारणें हें तमोगुणाशिवाय कसे होते ?

गुरु :- ही शंका बरोबर नाहीं. परमेश्वराचा अवतार जर तमोगुणी असतां तर त्याला मुक्ति देतां आली नसती. पण त्यानें असुरांस मुक्ति दिली आहे. सूर्याचा उदय झाला असतां, तो अंधकाराचा नाश करितो; म्हणून सूर्य तमोगुणी झाला काय ? तर, सूर्योदयानें अंधार जसा सहज नाश पावतो, तसा **शुद्धसत्वानें जेव्हां परमेश्वर अवतार घेऊन येतो**, तेव्हां तमोगुणाचा नाश होणें साहाजीकच आहे. ईश्वर हा गुणातीत असून अवताराच्या वेळीं शरीर धरतो तेंही शुद्धसत्वाचेंच धरितो. त्रिगुणाचें धरीत नाहीं. या ठिकाणीं योगसूत्रांत सांख्यांची- ' सत्वपुरुषान्यथाख्याति ' म्हणजे ज्ञान सांगितलें.

शिष्य :- महाराज, प्रकृतीची साम्यावस्था असतांना त्यांतून ईश्वर सत्वगुणच कसा काढून घेतो ?

गुरु :- प्रकृतीची साम्यावस्था जेव्हां असते, तेव्हां तिला आदिप्रकृति म्हणतात. व त्यावेळेस परमेश्वरही गुणातीतच असतो, आणि त्याला अवतार घेण्याचीही तेव्हां जरूर नसते. पण सृष्टीच्या उत्पत्तिकालीं प्रकृतीचे गुण विषम होतात आणि ईश्वरालाही तेव्हांच अवतार घ्यावा लागतो. त्यावेळेस ईश्वर प्रकृतींतला सत्वगुण काढून घेतो. जसें ताक घुसळतांना रवो जोंपर्यंत ताकांत आहे, तोंपर्यंत आपण लोणी बाहेर काढून घेत नाहीं;



परंतु रवी बाहेर काढल्यावर मग आपण ताकांतलें लोणीही काढून घेतों. तें पुन्हां ताकात ठेवणें अगर न ठेवणें ही आपल्या खुषीची गोष्ट आहे. त्याप्रमाणें सृष्टीच्या उत्पत्ति-कालीं प्रकृतीचे गुण विषम होतात तेव्हां त्यांतला सत्वगुण काढून घेण्यांत परमात्म्याला कांहीं अडचण पडत नाहीं.

प्रकृतीला आपला प्रकृतिपणा कायम ठेवण्याकरितां तीन गुणांची जरूर आहे; परंतु परमेश्वराला कांहीं प्रकृतींत सत्व ठेवावें अशी जरूरी नाहीं. प्रधानगौणतेकरितां ईश्वर तिच्यांत कांहीं सत्व ठेवीत असेल, पण घेतो सत्वच. परमेश्वराचें ज्ञान सर्वदा प्रमाणभूत आहे. व तो परमात्मा सर्वांचा गुरु आहे. पण येथें एक अडचण आहे, व त्यामुळें लोकांचा गैरसमज होण्याचा संभव आहे. पंचदशीच्या उपोद्घातांत अच्युतरायांच्या आर्या आहेत त्यांत ते म्हणतात

ईशोपदिष्टबोधादेव विमुक्तिर्न तु क्वचिद्गुरुजात् ।
इति या निर्णीतमतिः प्रतिबंधोऽयं चतुर्थ ईषमितौ ॥१५॥

ईश्वराच्या उपदेशानेंच मुक्ति होते व गुरूच्या उप-देशानें होत नाहीं, अशी समजूत तत्पदार्थ समजण्याला प्रतिबंधक आहे.

म्हणून अशी चुकीची समजूत मात्र कोणी करून घेऊं नये. कारण गुरुपरंपरेनें जें ज्ञान येतें तें ईश्वरापासूनच येतें. व ईश्वराचें ज्ञान निर्भ्रम असतें यांत वाद मुळींच नाहीं. मग तेंच ज्ञान ज्या कोणाला त्यानें प्रथम सांगितलें



त्याच्यापासून परंपरेनें निर्भ्रमच आलें पाहिजे. अशा त्या ज्ञानाचा कोणी उपमर्द करूं नये. कारण 'संत ज्ञानाचा कुरठा' या ज्ञानेश्वरमहाराजांच्या वचनाप्रमाणें ज्ञानाचें केवळ माहेर असे जे संत आणि गुरु यांचा अपमान केला तर स्वपुत्राचा अपमान केल्यामुळें पित्याला जसा क्षोभ होतो तसा संतांच्या उपमर्दानें ईशक्षोभ होऊन बुद्धीला प्रतिबंध होतो.

आत्मज्ञानांत ईश्वराचा व गुरु आणि संत यांचा म्हणजे मुक्तांचा उपदेश सारखाच आहे. याला दृष्टांत— आपल्या देहाला स्त्रीचा उपभोग स्वप्नांत होवो अगर जागृतींत होवो, केव्हांही झाला तरी रेतपतन झालेलें आपल्यास समजतें. परंतु काशींत आपणास कोणी कांहीं गोष्ट सांगितली असें स्वप्न दिसलें तर तो काशींतला मनुष्य कांहीं आपल्यास येथें दिसत नाही. त्याप्रमाणें आत्मज्ञान अति जवळचें असल्यामुळें संत, गुरु व ईश्वर या दोघांच्याही वचनानें होऊं शकतें. परंतु सृष्टीशीं आपला संबंध तितका निकटचा नसतो म्हणून जगत्व्यवस्थेंत मात्र ईश्वराचें वचनच प्रबल प्रमाण होय. म्हणून आत्मज्ञान हें प्रत्यक्ष ईश्वरानेंच सांगितलें पाहिजे असें नाहीं; तर परंपरेनें घेतलें तरी फलप्राप्ति सारखीच आहे. व श्रुतिमाताही असेंच म्हणते—

यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।



तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ।।

(श्वे. उ. ६–२३)

असा जो परमात्मा सर्वांचा गुरु आहे त्याची भक्ति करणें इष्ट आहे. आतां त्या परमेश्वराला कोणत्या नांवांनीं आळवावें, कोणत्या मंत्राचा जप करावा तें पुढल्या सूत्रांत सांगतील. (ता. २१-१०-०७)

।। श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वरमहाराज की जय ।।



**तस्य वाचकः प्रणवः ।। २७ ।।**

शिष्य :– महाराज, काल परमेश्वर सर्वांचा गुरु आहे असें निरूपण झालें. पण त्या परमेश्वराचें कांहीं नांव आहे काय ? व त्याला जपण्याचा कांहीं मंत्र आहे काय ?

गुरु :- होय, त्या परमेश्वराला नांव आहे, असें आजच्या सूत्रांत सांगतात. "तस्य वाचकः प्रणवः" ॐ हें त्या परमेश्वराचें नाव आहे. कांहीं पदार्थ असे आहेत कीं, त्यांच्या अर्थाचें ज्ञान सविकल्पक होतें. **सविकल्पक म्हणजे कल्पना करितां येते असें**. जसें 'खांब' या शब्दानें खांबाचें ज्ञानही होतें व तो मनांतही आणतां येतो. म्हणजे त्याचें ध्यानही करितां येते. तसेंच 'स्त्री' या शब्दानें स्त्रीचें ज्ञानही होतें व ती मनांतही आणतां येते.

कांहीं पदार्थ असे आहेत कीं, शब्दानें त्याचें ज्ञान होतें; पण ते वृत्तींत (मनांत) आणतां येत नाहींत. उदा.— 'काल' म्हटलें म्हणजे काल = वेळ असा अर्थ मनांत येऊन त्याचें ज्ञान होतें, परंतु 'काल' हा मनांत आणतां येत नाहीं. तसेंच 'सुख' या शब्दानें सुखाचें ज्ञान होतें, पण ध्यान होत नाहीं.

कांहीं पदार्थ असे आहेत कीं, शब्दानें त्यांचें ज्ञानही होत नाहीं व ध्यानही होत नाहीं. जसें-शशशृंग, वंध्यापुत्र- सशाला शिंग नसतें व वंध्येला पुत्र नसतो. या शब्दांत **अर्थक्रियाकारित्व** म्हणजे **अर्थाच्या योगानें कांहीं कार्य निष्पन्न होणें**-हें नसल्यामुळें ते शब्द व्यर्थ होत. 'काळ' शब्दाला अर्थक्रियाकारित्व आहे. तसें इतर पदार्थांचें त्यांच्या शब्दानें (नांवानें) ज्ञान व ध्यानही होतें. परमेश्वराचेंही तसेंच आहे. यावरून कांहीं पदार्थांचें शब्दानें नुसतें ज्ञानच होतें, ध्यान होत नाहीं, कांहीं पदार्थांच्या नांवानें त्यांचें ज्ञान व ध्यान दोन्ही होतात व कांहीं पदार्थ शशशृंगादि असे आहेत कीं, शब्दानें त्यांच्या अर्थाचें ज्ञान होत नाहीं व ध्यानही होत नाहीं, असें ठरतें.

आतां परमेश्वराचें ज्याच्या योगानें ज्ञान होईल व ध्यानही करितां येईल असा एक शब्द आपल्यास पाहिजे आहे. तर ॐ हें परमेश्वराचें नांव असेंच आहे कीं, त्याच्या योगानें परमेश्वराचें ज्ञानही व्हावें व तो सगुण झाला



असतां ध्यानही व्हावें. नामाच्या योगानें दोन गोष्टी होतात. मनुष्य जवळ असल्यास त्याला हाक मारतां येते, व तो दूर असला तर मनांत त्याची आठवण होते. उदाहरण- कृष्णराव हें नांव घेऊ. कृष्णराव जवळ असेल तर आपणाला त्या नांवानें त्याला हाक मारतां येईल व तो दूर असेल तर त्या नांवानें त्याची मनांत आठवण होईल. त्याप्रमाणें ॐ या नांवानें सगुण परमेश्वरास आपण आळवूं शकतों व निर्गुण परमेश्वर हा निराकार म्हणजे सर्वरहित (सर्वांहून वेगळा) आहे असें आपल्यास याचें चिंतन करितां येतें.

ॐ च्या चिंतनानें निराकार परमेश्वराची आठवण राहते व तो निराकार आहे हें समजल्यानें अलिप्त आहे असें समजतें. व ॐ या नांवाच्या अर्थचिंतनानें म्हणजे जप केल्यानें तो अलिप्त आहे तरी तारण्याला समर्थ आहे असें कळतें. आकाश शब्दानें जसें त्याचें व्यापकत्व कळतें व घटांत घेतलें तर तें पाणी वगैरे आणण्याची क्रियाही करण्यास समर्थ आहे असा त्याचा अर्थ कळतो, त्याप्रमाणें ॐ हें नांवही परमेश्वराच्या सगुण व निर्गुण स्वरूपाचें ज्ञान करून देतें. त्याला प्रणव म्हणतात.

शिष्य :– महाराज, हें नांव ॐ (प्रणव) कसें आहे? अग्नीचा व उष्णतेचा जसा संबंध आहे तसा ॐ चा व परमेश्वराचा कांहीं संबंध आहे काय ?



## ॐ व परमेश्वर यांचा सांकेतिक संबंध

गुरु :— ॐ या नांवाचा व परमेश्वराचा संबंध सांकेतिक आहे. संबंध दोन प्रकारचा असतो. सांकेतिक आणि स्वरूप. अग्नीचा व उष्णतेचा जो सबंध आहे तो स्वरूपसंबंध होय. तसा परमेश्वराचा त्याच्या नांवाशीं संबंध नाहीं. तो केवळ सांकेतिक आहे. वस्तु व शब्द यांचा संबंध सांकेतिक असतो. उष्णता व अग्नि यांसारखा जर त्यांचा संबंध पक्का म्हणजे स्वरूपसंबंध असता तर अग्नि शब्द उच्चारल्याबरोबर आपलें तोंड पोळलें असतें. म्हणून कृष्णराव शब्दानें कृष्णराव शब्द व ती व्यक्ति यांचा संबंध संकेतानें दाखविला जातो. कृष्णरावाचा त्याच्या हात पाय इत्यादि अवयवांप्रमाणें त्याच्या नांवाशीं स्वरूप-संबंध दाखविला जात नाहीं. तसें परमेश्वराचें ॐ हें नांवही सांकेतिक आहे. परंतु लौकिक नांवासारखें तें कांहीं कल्पित नाहीं. दगड, माती, खांब या नांवांप्रमाणें ॐ हें नांव नव्हे. लोक जसें कृष्णराव, विठ्ठलराव हें व्यक्तीचें नांव ठेवतात तसा संबंध ॐ या नांवाचा व परमेश्वराचा नाहीं. लौकिक रीति अशी आहे कीं, स्वतः ज्याचें नांव त्यानेंच सांगितलें पाहिजे. नाहीं तर अपरिचितास तें कळत नाहीं. बरें, माझें नांव अमुक म्हणून सांगणारा जो असतो त्यानें कांहीं तें नांव स्वतःस ठेवून घेतलेलें नसतें. तें त्याच्या



मातापितरादि वडिलांनीं ठेवलेलें असतें.

परंतु परमेश्वराचे नांवाचा प्रकार **अलौकिकच** आहे. त्याला कोणींच नांव ठेवूं शकत नाहीं. कारण,

न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यः (गी.११-४३)

या गीतावचनाप्रमाणें त्याच्यापेक्षां कोणीच वरिष्ठ नाहीं. व त्याच्या कृपेवांचून त्याला कोणी ओळखीत नाहीं. परमात्मा गीतेंत म्हणतात–

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।
अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ।।२।।

(गीता अ. १०)

माझी उत्पत्ति देवऋषि जाणूं शकत नाहींत. कारण ऋषि व देव या सर्वांच्या पूर्वी मी आहें. बापाची उत्पत्ति पुत्रास माहीत नसते. असा हा परमात्मा सर्वांच्या पूर्वी असल्यामुळें त्याची उत्पत्तिच कोणास माहीत नाहीं, मग नांव कसें ठेवूं शकतील ? यावरून त्यानेंच आपल्यास ॐ हें नांव ठेवून घेतलें असलें पाहिजे. व त्यानेंच देवांना व ऋषींना आपलें नांव सांगितलें असलें पाहिजे. नाहीं तर कळलें नसतें. आतां ॐ हें नांव भगवंतानें आपल्यास केव्हां ठेऊन घेतलें हें कळत नाहीं, म्हणून तें अनादि आहे, असें समजणें बरें. परमेश्वरानें माझें नांव ॐ आहे असें सांगितले आहे, याला गीताच प्रमाण आहे.

ॐइत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।।



य: प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥१३॥

(गीता अ. ८)

ॐ हें एकाक्षरी ब्रह्म आहे. या नांवाचा जप करीत माझें जो स्मरण करील, तो परमगतीला जाईल. यावरून ईश्वरानेंच आपलें नांव ठेवून घेतलें आहे व मायबाप ठेवितात त्याप्रमाणें तें कांहीं कल्पित नाहीं, तर यथार्थ आहे हे सिद्ध झालें. ईश्वराचा व त्याच्या नांवाचा संबंध हा पूर्वींचाच आहे. तो संकेतानें दाखविला जातो. ज्याप्रमाणें मुलाचा व बापाचा संबंध पहिलेच असतो, परंतु तो फक्त संकेतानें दाखवून दिला जातो, त्याप्रमाणें ॐ या नांवाचा व परमेश्वराचा पूर्वींच असलेला संबंध ऋषींनीं फक्त संकेतानें दाखवून दिला. संकेतानें फक्त वाच्यवाचक संबंध दाखवून दिला जातो. तें नांव ज्याचें असतें तो वाच्य होय, व तें नांव हें त्याचें वाचक होय, आजच्या सूत्रांत प्रणव ॐ हें नांव वाचक व परमेश्वर हा वाच्य होय. त्याचा संबंध सूत्रकारानें संकेतानें दाखविला आहे. हें वाचक नांव खोटें नसून यथार्थ आहे. हा अर्थ भाष्य व वार्तिक यांच्या अनुसार झाला. व गीतेंतील "ओम् इत्येकाक्षरं ब्रह्म" या वचनावरूनही ओम् हें नांव ईश्वरानें आपल्याला ठेवून घेतलें असें वर सांगितलें. ज्ञानेश्वरमहाराजांनींही असेंच म्हटलें आहे–

तरी अनादि परब्रह्म । जें जगदादि विश्रामधाम ।



तयाचें एक नाम । त्रिधा पैं असे ॥३२८॥
तें कीर अनाम अजाति । परि अविद्यावर्गाचिये राती ।
माजी ओळखावया श्रुति । खूण केली ॥३२९॥
उपजलिया बाळकासी । नांव नाहीं तयापासी ।
ठेविलेनि नांवेंसी । ओ देत उठी ॥३३०॥
कष्टले संसारशिणें । जे देवो येती गाऱ्हाणें ।
तया ओ दे नांवें जेणें । तो संकेत हा ॥३३१॥
ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतत्वें तो भेटावा ।
ऐसा मंत्र देखिला कणवा । वेदें बापें ॥३३२॥
मग दाविलेनि जेणें एकें । ब्रह्म आळविलें कवतिकें ।
मागां असत ठाके । पुढां उभें ॥३३३॥

आतांपर्यंत केलेलें प्रतिपादन ह्या ओव्यांत फार सुदर रीतीनें सांगितलें आहे.

शिष्य :– महाराज, कोठें कोठें ओम् हें ब्रह्माचें (ईश्वराचें) स्वरूप आहे असें सांगितलें आहे. मांडुक्योपनिषदांतही ओम् हें अक्षर सर्वत्र व्यापक आहे असें सांगितलें आहे.

**ॐ चे ईश्वरत्व व व्यापकत्व भावने करितां**

गुरु :– तें कांहीं खऱ्या रीतीनें सांगितलें नाहीं. ओम् हें अक्षरच ईश्वर आहे व तें सर्वव्यापक आहे हें भावनेकरितां सांगितलें आहे. उदाहरण–राजा देव आहे,



असें सांगणें हें नुसतें भावनेकरितां असतें. सर्व प्रजेनें त्याच्या आज्ञेंत राहावें, इतकाच त्याचा उद्देश असतो. म्हणून राजा कांहीं खरोखर देव नव्हे. जर तो देव असता, तर एखादे वेळीं प्रजा बिथरली असतां त्याला भीति वाटली नसती. भीति वाटणें हें जीवास असतें, ईश्वरास नसतें. त्याप्रमाणें ओम् हें अक्षर ब्रह्म आहे असें जें म्हटलें तें केवळ ध्याना-करितां म्हटलें असें समजावें. ज्ञानेश्वरमहाराज अमृतानु-भवांत म्हणतात–

किंबहुना तिये । प्रणवाक्षरे विरूढतीये ।
दशेचीही वैरिये । शिवूशक्ति ॥४४॥ (प्र.–१)

म्हणजे प्रणवाक्षर हे शिवशक्तीचें स्वरूपच आहे. ज्ञानेश्वरींतही अशी एक ओवी आहे–

म्हणौनि प्रणवैक नाम । हें एकाक्षर ब्रह्म ॥
जो माझें स्वरूप परम । स्मरतसातां ॥ ११८ ॥

(ज्ञा. अ. ८)

मांडुक्योपनिषदांतही "ओम् इदं सर्व" अशी श्रुति आहे. या सगळयांचा उद्देश भावना करण्याकडे आहे. म्हणजे ज्याला ब्रह्माचें ज्ञान झालें नाहीं त्यानें ओम् हें सर्वव्यापक ब्रह्म आहे अशी भावना करून जप करावा, त्या-योगानें रज आणि तम यांचा नाश होऊन सत्वगुण वाढल्यामुळें ज्ञान होईल. उदाहरण– ज्यानें चतुर्भुज मूर्ति पाहिली नाहीं त्यानें सगुण मूर्तीची कल्पना मनांत



आणून ध्यान केल्यास चतुर्भज मूर्ति प्रगट होईल, त्याप्रमाणें ॐ ह्या नांवानें ब्रह्म व्यापक आहे अशा रीतीनें भावना करावी. अनुभूतिप्रकाशांत म्हटलें आहे.

यदोंकारस्य सार्वात्म्यं ध्यानायैतन्न वस्तुतः ।
यद्ब्रह्मणस्तु सार्वात्म्य वस्तुतोऽप्येतदीक्षताम् ।।७।।

( अ. २० )

म्हणजे ॐकाराचें सार्वात्म्य हें खरें नाहीं. तें नुसतें ध्यानाकरितां सांगितलें आहे. परंतु ब्रह्मवस्तूचें सर्वात्मत्व मात्र यथार्थ आहे. उदाहरण-- 'त्याला जिकडे तिकडे स्त्रीच दिसते' म्हणजे स्त्री वास्तविक नसते पण त्याची भावना तशी आहे हें सुचविलें. त्याप्रमाणें जिकडे तिकडे ॐ आहे हें सांगणें केवळ भावनेकरितां आहे. हें ज्ञान नव्हे. पण ब्रह्म सर्वत्र व्यापक आहे, हें मात्र यथार्थ ज्ञान होय. भावना म्हणजे एका पदार्थाची दुसऱ्या पदार्थावर कल्पना करणें, आणि ज्ञान म्हणजे वस्तु जशीची तशी दिसणें, हें यथार्थ ज्ञान होय.

**यथार्थ ज्ञान होण्यास भावना उपयोगी.**

यावरून भावना हो ब्रह्माचें यथार्थ ज्ञान होण्याचा एक उपाय आहे असें झालें व ॐ चें सार्वात्म्य जें सांगितलें तें अशी भावना करितां येण्याकरितांच आहे. अशी भावना धरून ॐ चा जप करितां करितां अविद्या जसजशी नष्ट



होत जाते तसतसा त्याबरोबर ॐकारही उच्चाररहित होतो. अविद्या आहे तोंपर्यंत श्रुतीनें ॐ ही एक खूण केलेली आहे. परंतु अविद्या नष्ट झाली म्हणजे प्रणव (ॐ) हाही उच्चाररहित होतो. मांडुक्योपनिषदांत सांगितलें आहे कीं, स्थूल शरीर, सूक्ष्म मन, आणि यांना कारण असलेली अविद्या हे तिन्ही नष्ट झाले म्हणजे ॐकार हा अमात्र राहतो. अमात्र म्हणजे मात्रा नाहींत असा. ज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

तैसें ॐ हें स्मरों सरे । आणि तेथेंची प्राण पुरे ॥
मग प्रणवातीत उरे । पूर्णघन जें ॥ ११७ ॥
(ज्ञाने. अ. ८)

अर्थ :– ॐच्या अर्थाचें ध्यान करतां करतां अविद्या नष्ट झाली म्हणजे ॐ हें सरतें, म्हणजे उच्चार संपतो तेव्हां जें कांहीं राहतें तें पूर्णघन असें ब्रह्मरूप राहतें. उच्चार संपला तरी प्रेम राहतोच. स्त्री पतीचें नांव घेत नाहीं–उच्चार करीत नाहीं, पण प्रेम तिचे मनांत असतो. पतीचें नांव ती मनांत घेत असते. कारण नांवाशिवाय–शब्दाशिवाय वस्तु मनांत येत नसते. उदाहरण– थाली हा शब्द पहिले मनांत आला पाहिजे. नंतर थाली ही वस्तु मनांत येईल.

" शाब्दिका मन्यंते शब्दार्थयोर्नित्यसंबंध: "

या सूत्राप्रमाणें व्याकरणांत शब्दाचा व अर्थाचा



नित्य संबंध मानतात. त्यावरून ईश्वराचा व ओंकाराचा नित्य संबंध ठरतो; व तो जसा या कल्पांत आहे तसा मागल्याही कल्पांत होता व पुढल्याही कल्पांत राहील. म्हणून वेद हे ईश्वरप्रणीत असून नित्य आहेत हें ठरले. परमात्म्याच्या प्रीतीमुळें–भक्तीमुळें–सत्पुरुषांच्या चित्तांत ॐ हें नांव नेहमीं राहतें; हें नांव म्हणजे श्रुतीनें केलेला संकेत होय, व तें नांव कल्पित नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. **संकेतालाच निर्देश म्हणतात.**

### ॐ उपलक्षणानें भगवन्नाम निर्देश

आतां, असा एक नियम आहे कीं, कोणत्याही वस्तूचें नांव संख्येनें सांगितलें कीं, त्याच वस्तूचें ग्रहण अधिक संख्येनें होत असतें, यालाच **उपलक्षण म्हणतात**. उदा.– एक गोटा म्हटलें कीं, एकापेक्षां अधिक दोन चार गोट्यांची कल्पना येते. 'गोटा' असें नुसतें उच्चारलें तर कांहीं नाही. परंतु संख्याविशेषण लाविलें असतां जास्त गोटे मनांत येतात. तसेंच ॐ हें नांवही देवानें संख्यावाचक विशेषण लावून सांगितलें आहे. 'ॐ इत्येकाक्षरंब्रह्म' ॐ हें एकाक्षरब्रह्म आहे असें म्हटलें आहे, यावरून उपलक्षणानें दोन अक्षरी, तीन अक्षरी, चार अक्षरी, ब्रह्म असलें पाहिजे. 'अक्षरं ब्रह्म' असें म्हटलें असतें तर ॐ हेंच नांव घेतलें असतें. पण आतां ॐ ह्रीं, ॐ ऐं क्लीं, असे मंत्रही देवाचीं

नांवेंच झालीं. वामनपंडितांनीं यथार्थदीपिकेंतही असेंच म्हटलें आहे. तसेंच गीतेंतही 'ॐइत्येकाक्षरं ब्रह्म' हें जसें आठव्या अध्यायांत सांगितलें, तसेंच १७ व्या अध्यायांत

ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।। २३ ।।

असें तीन अक्षरी शब्दानें ब्रह्माचें नांव सांगितलें, व दहाव्या अध्यायांत विभूतियोगांत 'वृष्णीनां वासुदेवोऽस्मि' असें चार अक्षरी नांव सांगितलें. 'ॐ तत् सत्' हें परत्म्याचें दोन अक्षरी नांव जसें वेदांनें सांगितलें तशींच राम, कृष्ण, हरी, हीं देवांचीं नांवें पुराणानें प्रगट केलीं आहेत. 'प्रणव' शब्दाचा अर्थच मुळीं अशा प्रकारचा आहे. 'नूयते स्तूयते प्रकर्षेण अनेनेति प्रणवः' म्हणजे विशेषेंकरून ज्याच्या योगानें स्तुति केली जाते तो प्रणव. यावरून एकाच अक्षरानें किंवा दोन चार अक्षरांनींच ईश्वराची स्तुति होते असें नाहीं; तर जितक्या अक्षरांनीं भगवंताला आळवावें तितके शब्द प्रणव झाले. ह्याचें स्पष्टीकरण मी 'अमोघनिरूपण' ह्या ग्रथांत केलें आहे तें पाहावें. यावरून भाष्यकारांनीं जसा भावनेला ॐकार सांगितला आहे, तशीं ईश्वराचीं सर्वच नावें भक्तीचा स्वीकार करण्यास योग्य आहेत, असें सिद्ध झालें. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात— हरि हरि हरि मंत्र हा शिवाचा ।

म्हणती जे वाचा तयां मोक्ष ।।

ज्ञानदेव म्हणे हरि जप करणें । तुटेल धरणें प्रपंचाचें ।।



तें नाम सोपेंरे राम कृष्ण गोविंद।
वाचेसी सद्‌गद जपा आधीं ॥

तुकाराममहाराज म्हणतात–

ॐतत्सदिति सूत्राचें हें सार ॥ कृपेचा सागर पांडुरंग ॥१॥
हरिः ओम् सहित उदित अनुदित ॥
प्रचुरीश्वरासहित पांडुरंग ॥२॥
गोब्राह्मणहिता होउनी निराळे ॥
वेदाचें तें मूळ तुका म्हणे ॥३॥

या अभंगांत तुकाराममहाराजांनीं पांडुरंग व ओम् या नावांचें साम्य दाखविलें आहे. याप्रमाणें ओंकारानें सगुण व निर्गुण परमेश्वराच्या नांवाचा जसा जप होतो त्याप्रमाणें त्याच्या कोणत्याहि नांवानें त्याची प्राप्ति होते हें सिद्ध झालें. व रामकृष्ण नांवानें त्याच परमात्म्याची सगुण उपासना घडूं शकते हेंही ठरलें.

शिष्य :– महाराज, रामकृष्णादि नांवें देवाच्या अवतारकालीं आई बापांनीं ठेविलीं आहेत, मग त्यांचें व ओंकाराचें कसें साम्य होऊं शकतें?

गुरु :– या शंकेचें निराकरण उद्यां सागूं.

(ता. २२-१०-१९०७)

श्रीमत्सद्‌गुरु ज्ञानेश्वरमहाराजकी जय.





गुरु :- कालच्या निरूपणांत प्रणव आणि शभु, हरि, ही सर्व नांवें आपण एकाच रेषेमध्यें आणलीं होतीं, म्हणजे तीं सगळीं एकाच तत्वावर आहेत-सारखीं आहेत-असें सांगितलें.

शिष्य :- महाराज, ओम् हें नांव परमेश्वरानें आपल्यास सांगितलें आहे; पण रामकृष्णादि नांवें हीं तर देवाच्या अवतारकालीं आईबापांनी ठेविलीं आहेत, मग त्या नांवांचें व ओंकाराचें साम्य आपण कसें करितां ?

**भगवन्नाम लौकिक संबंधरहित.**

गुरु :- ही शंका बरोबर नाही. कारण शिवाचें नांव शिवाच्या आईबापांनीं ठेविलें असतें तर पुराणांत किंवा वेदांत शिवाला आईबाप सांगितला असता; पण सांगितलेला दिसत नाहीं. तसाच विष्णु व ब्रह्मदेव यांनाही वेदांत व पुराणांत कोणी आई बाप सांगितला नाहीं. पुराणांत शिव व विष्णु यांना आईबाप सांगितला आहे असें कोणाचें मत असेल तर तें पाखंड मत होय, व तें वेदबाह्य आहे. म्हणून पाखंड मत घ्यावयाचें नाहीं. वेदांत शिव व विष्णु या नांवानें परमात्म्याची स्तुति आढळते. रुद्रांत शिव, शंकर, रुद्र हीं शिवाचीं नांवें आहेत. 'इदं विष्णुर्विचक्रमे' 'तद्विष्णोः परमं पदम्' असें हें विष्णूचे नांव वेदांत आहे. वेद हे ईश्वरप्रणीत आहेत, हें मागें सांगितलेंच आहे. ( पान ९७ पहा ) सर्व धर्मसमजुतीही



अशाच आहेत कीं ज्ञान हें ईश्वरापासून आलें आहे. म्हणून हीं नांवें ऋषींनीं ठेविलेली नव्हत. पुराणेंही तशीच ईश्वरप्रणीत असलीं पाहिजेत; कारण वेदांत पुराणांचे नांव आहे, व

पुराणं पंचमं वेदानां वेदं---भगवोऽध्येमि ॥

(छां. उ. ७-२)

असें श्रुतिवचनही आहे. यावरून पुराणें ही ईश्वर-प्रणीत आहेत.

शिष्य :- पुराणें हीं शंकराचार्यांच्या नंतर झालीं असा एक लोकांत वाद आहे, तो यावरून खोटा दिसतो.

गुरु :- अर्थातच. कारण व्यास हे शंकराचार्यांच्या पूर्वीं झाले. पण त्यांनीं सुद्धां पुराणें केलीं नाहींत असें प्रमाण आहे. फक्त पुराणाचे त्यांनीं भाग केलेत येवढेंच. व्यासांनी योगसूत्रावरील भाष्यांत विष्णुपुराणांतलें वचन घेतलें आहे, तें हें-

स्वाध्यायाद्योगमासीत योगात् स्वाध्यायमामनेत् ।
स्वाध्याययोगसंपत्त्या परमात्मा प्रकाशते ॥ २५ ॥

(वि. पु. ६-६)

आणखी ब्रह्मसूत्रावरील भाष्यांत-

अपि च नरका रौरवप्रमुखा दुष्कृतफलोपभोग-
भूमित्वेन स्मर्यन्ते पौराणिकैः ॥

(ब्र. सू. शं. भा. ३- १-१५)

म्हणजे पुराणांत सप्तनरक सांगितले आहेत—असें पुराणांचे प्रमाण व्यासांनीं घेतले आहे. पुराणें हीं व्यासप्रणीत असतीं तर आपलेंच वचन त्यांनीं कसे प्रमाण घेतलें असतें ? यावरून शंकराचार्यांच्या नंतर पुराणें झालीं हा वाद तर नष्ट झालाच; पण आणखी तीं पुराणें ईश्वरप्रणीत आहेत असेंच ठरतें. पुराण हें पहिलें एकच होतें, पण व्यासांनीं त्याचे अठरा भाग केले पुराणें ईश्वरप्रणीत असल्यामुळें त्यांतलीं ईश्वराचीं नांवें ऋषींनीं ठेविलेलीं नव्हत. भागवतही ईश्वरप्रणीत आहेच. म्हणून पुराणांत देवाचीं जीं नांवे आहेत तीं कोणीं नवीन ठविलीं नाहींत. रामकृष्णादि नांवें वेदांतही आहेत. जसें ॐचे महात्म मांडुक्योपनिषदांत आहे तसें कृष्णोपनिषदांत कृष्णनाममहात्म्य सांगितलें आहे. जसें—

कृषिर्भूवाचकः शब्दो नश्च निवृत्तिवाचकः ।।
तयोरैक्यं परं ब्रह्म कृष्ण इत्यभिधीयते ।।

कृषि म्हणजे 'नः' पूर्णता. हें आनदार्थी आहे. दोन्ही शब्द एक केले म्हणजे त्याचा अर्थ कृष्ण असा होतो. नृसिहपूर्वतापनीयोत्तरतापनीयोपनिषदांत नृसिहाचीं नांवें सांपडतात. तसेंच रामपूर्वतापनीयोत्तरतापनीयोपनिषदांत रामाचीं नांवें आहेत. 'कृष्णाय देवकीपुत्राय' असे वचन छांदोग्यांत सांपडतें. नारायणोपनिषदांत नारायणाचें नांव आहे. कैवल्योपनिषदांत व श्वेताश्वतरोपनिषदांत शिव, रुद्र यांचीं नांवें सांपडतात. देव वगैरे सामान्य नांवें गायत्रीमंत्रांत



आढळतात. याप्रमाणें परमात्म्याचीं पुष्कळ नावें वेदांत सांपडतात.

असें आहे तरी कर्माच्या रीतीनें प्रणव सगळ्या नांवाच्या आधीं घ्यावा लागतो. पण भक्तीत मात्र सर्व नांवें सारखींच आहेत. ज्याप्रमाणें एखाद्या पुत्राचें जन्मनांव, आळवतें नांव, व्यावहारिक नांव, अशीं अनेक नांवें असतात, आणि जन्मनांवानें हाक मारण्याचा प्रघात नसला तरी व्यावहारिक नांवानेंच त्याची सही वगैरे घेतली जाते, त्याप्रमाणें परमेश्वराच्या ह्या सगळ्या नांवांत जरी साम्य आहे तरी ज्या ज्या कर्मांत ऋषींनीं जो जो प्रचार पाडला तें तें नांवच तेथें येतें. भगवद्गीतेंत

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपः क्रियाः ।
प्रवर्तते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥२४॥

(गीता अ. १७)

हा श्लोक आणि त्याच्या पुढचे दोन श्लोक "तदित्यनभिसंधाय" इ. यांत सांगितल्याप्रमाणें ओम् हें पहिलें आणि तत्सत् हें शेवटीं म्हणणें हा विनियोग जसा ब्राह्मणांत आहे तसाच तो केला पाहिजे. विनियोग म्हणजे मंत्राचा विधि किंवा उपयोग. वैदिक मंत्रांत ओम् आणि शाक्तमंत्रांत ऱ्हीं हे मंत्राच्या पहिले लावले पाहिजेत. परंतु भक्तीच्या पक्षांत मात्र ईश्वराचीं सर्व नांवें उत्तम मानलीं आहेत.

शिष्य :- वासुदेव हें जन्मनांव वसुदेवाचा मुलगा

या नात्यानें ठेविलें आहे. तें कल्पित नाहीं काय ?

गुरु :— वासुदेव हें नांव कल्पित नाहीं. व वसुदेवाचा मुलगा झाल्यामुळेंही देवाला हें नांव मिळालें नाहीं. त्याच्याही पूर्वींपासून तें नांव आहे. वासुदेवोपनिषदांत एकाच वासुदेवाचीं अनेक नांवें सांगितलीं आहेत. गीतेंतही "वृष्णीनां वासुदेवोऽस्मि" "वासुदेवः सर्वमिति" अशीं नांवें देवानें आपणच सांगितलीं आहेत. तसेंच कलिसंतरणोपनिषदांत—

हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।।

हा मंत्र आहे. यांत हरि हें नांव आलें आहे. यावरून हीं सर्व नांवें वेदांत सांगितलीं आहेत हें ठरलें.

शिष्य :- महाराज, ब्राह्मणांत 'हरिः ओम्' म्हणण्याचा परिपाठ कधींपासून चालत आला आहे ?

गुरु :- "हरिः ओम्" हा निर्देश वेदपठणाच्या आदिअंतीं करण्याचा परिपाठ अनादि कालापासून आहे असेंच म्हणावें लागतें. कारण—

वेदे रामायणे चैव पुराणे भारते तथा ।
आदौ मध्ये तथा चांते हरिः सर्वत्र गीयते ।।

असें श्रेष्ठांचें वचन आहे. एकनाथमहाराजांनीं

वेदाचें हें बीज हरि हरि अक्षरें ।



असें म्हटलें आहे. मोठमोठे विद्वान् व वेदाच्या मंत्राची शक्ति जाणणारे मागें होऊन गेलें त्यांनीं हा परिपाठ पाडून ठेवला व आतांही वेदाच्या मत्रानें कर्म करणारे असतील ते सर्व 'हरिः ओम्' असेंच म्हणतात.

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ।।२१।।
(गीता अ. ३)

म्हणजे श्रेष्ठ जें आचरण करितात तें व श्रेष्ठ जें प्रमाण करून ठेवतात त्याप्रमाणें आपणही वागावें. म्हणून वरील "हरिः ओम्" म्हणण्याचा परिपाठ अनादि कालापासून चालत आला तोच आपणही मानावा. त्याची कालनिर्देशकल्पना आपल्या उपयोगाची नाहीं.

शिष्य :– 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः' या वचनाप्रमाणें लोक श्रीकृष्णाच्या आचरणावरून परस्त्रीगमन करूं लागतील.

**श्रेष्ठाचें वचन प्रमाण**

गुरु :– मूर्खा, म्हणूनच देवांनीं "स यत्प्रमाणं कुरुते" असें पद श्लोकाच्या उत्तरार्धांत घातलें आहे, व अर्जुनाला देवानें तसा उपदेश गीतेंत केलाही नाहीं. म्हणून असा विपरीत अर्थ घेऊं नये. "स यत्प्रमाणं कुरुते" हें पद उत्तरार्धांत घातलें आहे तें असा विपरीत अर्थ कोणीं



घेऊं नये म्हणूनच आहे. म्हणजे श्रेष्ठ जें आचरण प्रमाण म्हणतील तें करावें. त्यांचें वाईट आचरण घेऊं नये. भागवतांत म्हटलें आहे–

ईश्वराणां वचः सत्यं तथैवाचरितं क्वचित् ।

(भा. स्कं. १०-३३)

श्रेष्ठाचें वचन सत्य मानावें व ते सांगतील तसें वागावें. ते वागतील तसें वागू नये. कारण ते सांगतात तसें त्यांचें आचरण क्वचित् असतें, क्वचित् नसतें. म्हणून त्यांचें चांगलें आचरण घ्यावें. शिक्षाध्याय तैत्तिरीयोपनिषदांत हें अगदीं स्पष्ट सांगितलें आहे–

यान्यस्माकँ सुचरितानि तानि त्वयोपास्यानि ।

नो इतराणि ॥२॥ (अ. ११)

म्हणजे मोठ्याचें चांगलेंच आचरण घ्यावें–वाईट घेऊं नये. दुसरी गोष्ट अशी कीं, देवाचीं जशीं वाईट चरित्रें असतात तशी चांगलींही चरित्रें अगदीं अलौकिक असतात. तीं कां घेऊं नयेत ? हरिविजयांत श्रीधर म्हणतात– श्रीकृष्णाच्या चरित्रावरून जर परस्त्रीगमन करावयाचें तर त्यानें गोपालांना वणव्यांतून वांचविण्याकरितां बारा गांव अग्निही गिळला, तें मात्र कोणीच करूं शकत नाहीं. शंकरांनीं हालाहल विष घेतलें. दुसऱ्याला त्याचा एक बिंदूही जिवंत राहूं देणार नाहीं. म्हणूनच "न देवचरितं चरेत्" असें स्मृतिही आपल्यास सांगते.



शिष्य :– परमेश्वरानें सगळीं चरित्रें उत्तमच कां केलीं नाहींत ? वाईट चरित्रें त्यानें कां केलीं ?

गुरु :– वाईट चरित्रें परमेश्वरानें केलीं त्याचा उद्देश असा कीं, असें कर्म करूनही अविद्यादि क्लेश आपल्यास कधींच त्यापासून झाले नाहींत, हें दाखवावें. परमात्मा पाप आणि पुण्य ह्या दोन्ही गोष्टींपासून निराळा आहे, असें ह्यावरून दाखविलें. रामानें एकपत्निव्रत पाळून कांहीं वैकुंठ मिळविला नाहीं, किंवा कृष्णानें सोळा हजार एकशें आठ स्त्रिया करून कांहीं नरकास गेला नाहीं.

शिष्य :– पण महाराज, येथें एक विशेष गोष्ट ही आहे कीं, रामानें सगळी अयोध्या एकपत्निव्रताच्या प्रभावानें वैकुंठास नेली व कृष्णानें वाईट आचरणानें आपल्या यादव कुळाचा नाश केला असा एक लोकापवाद आहे.

गुरु :– हा लोकापवाद खरा नाहीं. रामानें अयोध्या वैकुंठास नेली ती एकपत्निव्रताच्या पुण्यानें नेली म्हणणें हा केवळ अर्थवाद आहे. तें केवळ नीतीच्या स्तुतीकरितां आहे; असें न मानलें तर महानंदा व राम हे बरोबरच झाले. कारण महानंदा जीव होती व तिनेंही सगळी नगरी कैलासास नेली, अशी कथा ब्रह्मोत्तरखंडांत आहे. तसाच प्रकार रामाचा मानला तर रामही जीव होईल. म्हणून लोकांचा प्रवाद खरा नाहीं. दुसरें, राजनीतीच्या दृष्टीनें राम हा राजा असल्यामुळें राजाप्रमाणें प्रजाही पुण्याचरण



करणारी होती म्हणून ती आपल्याच पुण्यानें वैकुंठास गेली. आतां यादवांविषयीं विचार केला तर ते आपल्या आचरणानेंच नाश पावले. सांबानें स्त्रीवेष घेऊन ऋषींचा अपमान केला त्यामुळें ऋषीच्या शापानें मुसळ उत्पन्न झालें व त्यानें सर्वांचा नाश झाला. प्रजेविषयीं म्हणशील तर खरा राजा कृष्ण आहे किंवा उग्रसेन आहे याचा प्रजेला संशय होता म्हणून प्रजेचें आचरणही साधारणच होतें.

शिष्य :– श्रीकृष्ण जवळ असून यादवांनीं असें आचरण कां केलें ?

### परमेश्वराची ओळख करून देणारा गुरुच

गुरु :– ही शंका बरोबर नाहीं. सांब वगैरे यादवांनीं श्रीकृष्णाचें वचन विशेष प्रमाण मानलें नाहीं. व दुसरें, परमेश्वर जवळ असल्यानें मनुष्य सुधारतो असा नियम नाहीं. उदाहरण, दोरीवर सर्प भासतो तो दोरीच्या ज्ञानानें दूर होतो. तेथें दिवाच पाहिजे. तसा परमेश्वर जवळ असला तरी त्याची ओळख करून देणारा गुरुच पाहिजे. गुरु असल्याशिवाय मनुष्य सुधारत नाहीं. कारण परमेश्वराचा कोणत्याच गोष्टीशीं विरोध नाहीं. आकाश हें जसें अंधार व प्रकाश यांना आधार आहे तसाच परमेश्वर पापाला व पुण्याला आधार आहे. आकाशाच्या योगानें अंधार नष्ट होत नाहीं, तर तो सूर्याच्या योगानें नष्ट होतो.



तसा परमेश्वर जवळ असला म्हणजे अज्ञान दूर होतें असें नाहीं तर तें दूर होण्याला परमेश्वर हा गुरुरूपच झाला पाहिजे. श्रीकृष्ण परमात्मा जसा अर्जुनाला गुरुरूप झाला तसा तो यादवांना झाल्याचें उदाहरण दिसत नाहीं. उद्धवाला मात्र तो गुरुरूप झाला. त्याचा परिणामही उत्तम झाला हें प्रसिद्धच आहे.

परमेश्वराच्या पुण्यानें जर सगळे लोक (अयोध्येचे) उद्धरले असतील तर परमेश्वर हा सर्वदाच पुण्यवान् असल्यामुळें सर्व जगच उद्धरून कां न जावें ? नरकांत कोणीच पडू नये. म्हणून असें म्हणणें श्रुतीला, युक्तीला व अनुभवाला जुळत नाहीं. **श्रीकृष्णाचे चरित्रांत ईश्वरपणा जास्त व्यक्त** आहे. आणि **रामअवतारांतील चरित्रांत साधूपणाचीं लक्षणें** जास्त आहेत. इतिहासदृष्टया कृष्णअवताराशिवाय दुसऱ्या अवतारांत ईश्वरत्वाचीं सर्व लक्षणें म्हणजे अविद्यादि क्लेश वगैरे यांची कधीं बाधा न होणें हीं सांपडत नाहींत.

शिष्य :– परमेश्वरास पाप व पुण्य हे दोन्हीहि जर नाहींत तर दुष्टांनीं त्याचा द्वेष व भक्तांनीं त्याच्यावर प्रेम हें कां करावें ?

**श्रीकृष्ण चरित्र बोधक**

गुरु :– हा ज्याचा त्याचा स्वभाव आहे. सूर्योदयानें घुबडाचें डोळे बंद होतात पण तोच सूर्योदय चक्रवाकाला

केवळ अमृत होतो– ' सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा ' हें समर्थांचें वचन प्रसिद्धच आहे. ह्या दृष्टांताप्रमाणें श्रीकृष्णाचें चरित्र हें सुबुद्धांना बोध करणारें आहे. परंतु कुबुद्धि जे आहेत त्यांना तेंच चरित्र मोहांत पाडणारें आहे. विष्णुमहिम्नांत ब्रह्मानंदस्वामी म्हणतात–

क्वचिद्दिव्यं शौर्यं क्वचिदपि रणे कापुरुषता ॥
क्वचिद्गीताज्ञानं क्वचिदपि परस्त्रीविहरणम् ॥
क्वचिन्मृत्स्नाशित्वं क्वचिदपि च वैकुंठविभवः ॥
चरित्रं ते नूनं शरणद विमोहाय कुधियाम् ॥ १२ ॥

ब्रह्मानंद स्वामी म्हणतात, हे रक्षण करणाऱ्या भगवन्! तुझें चरित्र खरोखरच दुष्टांना मोह पाडणारें आहे शाल्वाशीं युद्ध करण्याचे वेळीं त्वां उत्तम प्रकारचें शौर्य दाखविलेंस. आणि कालयवनाचे वेळीं पळून गेलास. अर्जुनाला सर्व शास्त्रांचें सार अशी गीता सांगितलीस, आणि गोकुळांत परस्त्रियांबरोबर नानाप्रकारची क्रीडा केलीस गोकुळांत अजागळासारखी माती खाल्लीस आणि वैकुंठांत पहिलें तर तेथल्या श्रीमंती थाटाला लक्ष्मीही लाजते. म्हणून हे भगवन् ! उजेड व आंधार एके ठिकाणीं राहावे किंवा गाई आणि वाघ यांनीं एकेच ठिकाणीं पाणी प्यावें त्याप्रमाणें परस्पर विरोधि अशा गोष्टी तुमच्या ठिकाणीं असल्यामुळें, तें तुमचें चरित्र दुष्टांना मोह उत्पन्न करितें !



तेंच देवांचें चरित्र भक्ताला प्रेमानें आवडतें. तुकाराम-महाराज म्हणतात–

तुका म्हणे जें जें बोला । तें तें साजे या विठ्ठला ।।

खरोखर पाहिलें तर हीं भगवंताचीं चरित्रें त्याची सर्वांवर समान दया असल्यामुळें प्रगट झाली आहेत.

साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ।

(गीता ६–९)

हे त्यांचें ब्रीद असल्यामुळें कोणत्याही उपायानें आपलें भजनकरितां यावें व मनाच्या ज्याज्या प्रबल विकाराला आपण वश झालों असूं तो तो विकार त्याच्या त्या चरित्रानें नाश व्हावा म्हणून तीं चरित्रें आहेत.

कामविकार ज्यांना जास्त असेल त्यांनीं श्रीकृष्णाची भक्ति गोपिकांसारखी पतिभावानें करावी. वृत्तींत क्रोध जास्त असेल तर तो विषयाचे ठिकाणीं न ठेवतां कंसाप्रमाणें ईश्वराचे ठिकाणीं ठेवावा. लोभ करणें असेल तर नंद-यशोदेप्रमाणें श्रीकृष्णावरच करावा. धन पाहिजे असेल तर वैकुंठासारखें ऐश्वर्य व लक्ष्मीसारखी त्याची दासी आहे म्हणून त्याचीच भक्ति करावी. आपण जर दरिद्री असलों तर देवानेंही दरिद्री मनुष्याप्रमाणें माती खाल्ली म्हणून त्याच्याशींच सख्य करावें. 'समानशीलं व्यसनेषु सख्यम्' अशी म्हणच आहे. तसेंच आंगीं शूरत्व नसलें तर त्यांनीं उग्रसेनाप्रमाणें देवाचीच भक्ति करावी. जगाचा नियमही



असाच आहे कीं, आपल्यासारख्याशीं किंवा आपल्यापेक्षां वरिष्ठाशीं सख्य करितात. म्हणून परमेश्वरानें वरिष्ठपणा व बरोबरी दाखविली, कमीपणा दाखविला नाहीं. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तैसा गोपिकांसी कामें । तया कंसा भयसंभ्रमें ॥
येरां घातकां मनोधर्में । शिशुपालादिकां ॥

( ज्ञाने. ९ )

नारदसूत्रांतही असेंच वचन आहे-

काम क्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् ॥ ६५ ॥

स्तुति अथवा निंदा करावी देवाची ।
अधम तो वेची व्यर्थ वाचा ॥

असें तुकारामांनींही म्हणून ठेविलें आहे, याप्रमाणें त्वां विचारलेल्या सर्व शंकांचें निरसन करून श्रेष्ठांनीं जें वचन प्रमाण करून ठेविलें, तेंच आपणही मानलें पाहिजें, असें ठरलें. म्हणून हरि ओम् म्हणण्याचा परिपाठ श्रेष्ठां-पासून परंपरेनें चालत आलेला आहे, तोच आपणही चालू द्यावा.

**परमात्म्याची नांवें कल्पित नाहींत**

याशिवाय केशव नारायण वगैरे २४ नांवेंही संध्येच्या आरंभीं म्हणण्याचा परिपाठ आहे ही सगळीं नांवें ऋषींनी ग्रहण केलीं आहेत व पुराणांतही आहेत, म्हणून तीं कल्पित



नाहींत हें प्रमाणांनीं ठरलें. आतां आपण हें युक्तीनें ठरवूं.

ज्योतिषशास्त्रांत चू चे चो ला—अश्विनी, ली लू ले लो-भरणी, आईउए-कृत्तिका, याप्रमाणें सगळीं २७ नक्षत्रें अक्षरांवर बसविलीं आहेत. पण अमक्या अक्षरांचें अमकें नक्षत्र होतें असें बसविण्याला कांहीं प्रमाण नाहीं. अश्विनी नक्षत्राचे तीन तारे, भरणीचे तीन तारे, व कृत्तिकेचा दीड तारा अशी साडेसात नक्षत्रें मिळून एका मेष राशीचा आकार बनला आहे. सूर्य मेष राशीला आला म्हणजे सूर्याजवळ साडेसात नक्षत्रें दिसतात. हीं नक्षत्रें जशीं डोळ्यानें प्रत्यक्ष दिसतात तशीं अक्षरें दिसत नाहींत; परंतु त्या अक्षरांचें फळ मात्र होतें, यावरून तीं अक्षरें अर्थात् परमेश्वरास दिसतात व त्याच्या संकल्पाने त्यांचें फळ खरें होतें. क्वचित् खरें होत नाहीं ती ज्योतिषांची कांहींतरी चुकी असते म्हणून; परतु नुसती मुखचर्या पाहून जन्मनांव वगैरे सांगणारे आहेत. म्हणूनच ज्योतिष हे परमेश्वराचे डोळे आहेत असें म्हटलें आहे. यावरून ज्योतिषानें ठरलेलीं नांवें हीं कल्पित नसलीं पाहिजेत.

गर्गाचार्यांनीं पंचांग पाहून रामकृष्णांचीं नांवें ठेविलीं हें प्रसिद्ध आहे. म्हणून रामकृष्ण हीं नांवें जीं ठेविलीं तीं सिद्ध नांवेंच आहेत. कल्पित नाहींत. रामकृष्ण नांवें ज्यांनीं ठेविलीं त्यांनींच त्या नांवांचा महिमा वर्णिला आहे. रामाचा महिमा वसिष्ठांनीं वर्णिला. विश्वामित्रानें रामरक्षा



स्तोत्रांत रामनामाचा महिमा सांगितला. गर्गाचार्यांनीं कृष्णस्तुति वर्णन केली. इत्यादि. यावरून हीं नांवें पूर्वसिद्ध आहेत, हें ठरलें.

तिसरें, मंत्रशास्त्रपद्धतीनें आतां विचार करूं- ज्यानें फल होतें तेच मंत्र. रामकृष्ण नांवें मंत्रशास्त्रांत आहेत. त्यांत कल्पित नांवें चालणार नाहींत. मंत्रशास्त्राच्या नियमानुसारच नांवें पाहिजेत, आणि तीं अक्षरें मंत्रसिद्धच असलीं पाहिजेत. सांवळ्या, गोवळ्या अशीं नांवें मंत्रशास्त्रांत नाहींत, म्हणून रामकृष्णादि नांवें मंत्रशास्त्राच्या दृष्टीनेंही कल्पित ठरत नाहींत.

विष्णुसहस्रनामांत नामाचे दोन भेद सांगितले आहेत–

यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मन: ।
ऋषिभि: परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये ॥१५॥

(वि. स.)

भीष्माचार्य म्हणतात, भगवंताचीं गुणांवरून पडलेलीं अशीं गौण नांवें आणि ऋषींनीं गाइलेलीं विख्यात नांवें मी तुला 'भूतये' म्हणजे कल्याणासाठीं सांगतों. अनंत, भगवंत हीं नांवें गौण म्हणजे गुणांवरून पडलेलीं होत. व वेदांत आणि पुराणांत ऋषींनीं गाइलेलीं तीं विख्यात नामें होत. नामाचा महिमा ऋषींना माहित असला पाहिजे, म्हणून ऋषींनीं गाईलेलीं असें म्हटलें आहे. वामनपंडित

म्हणतात–

"म्हणूनी पुराणें प्रसिद्धें विचित्रें ॥"

स्मृति सांगते कीं ब्राह्मणाचीं नांवें मंगलवाचक असावीत. क्षत्रियांचीं बलवाचक, वैश्यांचीं धनवाचक व शूद्रांचीं नांवें निंदावाचक असावीत. यांत ब्राह्मणाचीं मंगलवाचक नांवें कोणतीं ठेवायचीं तें कल्पनेनें समजत नाहीं. पूर्वींचीं कोणाचीं तरी असलीं पाहिजेत. व ब्राह्मणाच्या पूर्वीं असणार देवाचीच. दुसरें, ब्राह्मणाचीं नांवें जर कल्पित ठेवायचीं नाहींत–मंगलवाचक ठेवायचीं–तर परमात्मा हा 'मंगलानां च मंगलम्' सर्व मंगलांतही मंगल आहे, मग त्याचीं नांवें मंगल असलीं पाहिजेत हें निराळें सांगणें नको. स्मृति म्हणते–

मंगलं भगवान् विष्णुर्मंगलं गरुडध्वजः ।
मंगलं पुंडरीकाक्षो मंगलायतनं हरिः ॥

रामकृष्ण या नांवाची शक्ति प्रणवासारखीच असून कर्मांत प्रणव व भक्तींत रामकृष्णादि नांवें घेतात हें मागें सांगितलेंच आहे.

शिष्य :– भाषांतरांत जीं देवाचीं नांवें आहेत तीं यथार्थ आहेत काय ?

**परमेश्वराचें कल्पित नांवहि श्रद्धेनें फळ देते**

गुरु :– भाषांतरांत जीं परमेश्वराचीं नांवें आहेत



तीं कल्पित असून त्यांचीं फळें श्रद्धेनें मिळतात. अवधूत-पंथांत भयस व भेलोंड हीं देवाला नांवें आहेत. भयस म्हणजे मोठा, भेलोंड म्हणजे हातपाय नाहींत असा. भेला = गोळा.

"बरमाइस्नुमहेस राहती भयसाच्या पोटांत"

असें एक वचन आहे. रामरसिकावलींत एक कथा आहे ती अशी– एक साधु होता. त्याच्याजवळ दोन मुली आल्या. त्या म्हणाल्या, महाराज आम्हांस शालिग्राम द्या. साधूनें त्यांना दोन गोटे दिले, व हेच शालिग्राम होत असें सांगितलें. मुलींनीं विचारलें, महाराज, यांचें नांव काय ? साधूनें गोटयांचें नांव 'शिलपिल्ले ठाकूर' असें सांगितलें. शिलपिल्ले म्हणजे दगडाचीं पिलीं. कांहीं दिवसांनीं त्या मुलींचीं लग्नें झालीं. तेव्हां आपल्या नवऱ्यासही त्यांनी त्या शिलपिल्ले ठाकुराची भक्ति करावयास सांगितलें. नवऱ्यानें ते दगड विहिरींत फेंकून दिले. मुली विहिरींत उडया टाकण्यास सिद्ध झाल्या. तेव्हां ते त्यांचे देव त्यांच्या ओटयांत येऊन पडले. तुकाराममहाराज म्हणतात–

भाव धरी तरी तारील पाषाण ।।

असो; तशींच सांवळा, गोवळा, वगैरे. हीं नांवेंहीं कल्पित आहेत. हीं गौण नांवें होत. विख्यात नव्हत. भावना असली तर त्यांचें फळ होतें.



तेथ प्रतिफळे भावना आपुलाली ॥ ७६ ॥
(ज्ञा. अ. ४)

असें श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें म्हणणें आहेच. प्रत्यक्ष सर्पदंशानें मनुष्य मरणें हें वस्तुमहात्म्य होय. व कांटा रुतून सर्पाची शंका आली असतां शंकाविषानें मृत्यु येणें हें भावनामहात्म्य आहे. वैद्यशास्त्रांतील सुश्रुतग्रंथांत शंकाविषाचीं लक्षणें सांगितलीं आहेत. कल्पित नांवाचा संबंधही कल्पितच असतो. ॐ ह्या नांवाचा संबंध सांकेतिक आहे हें मागें सांगितलेंच आहे. कल्पित नांवाविषयीं वामनपंडित नामसुधेंत म्हणतात–

भाषांतरीं कल्पितनाम जेथें ।
श्रद्धानुरूपेंचि फळेल तेथें ॥
प्रताप नैसर्गिक त्यास नाहीं ।
प्रसिद्ध नामीं फळ सर्वदांही ॥

भाषांतरानें कल्पित नांवेंही श्रद्धेनें फळतात. स्वयंप्रभाव त्यांचे आंगीं नाहीं. परंतु मुख्य नांवें भाव असो अगर नसो सर्वदां फळ देतात. मुख्य नांवांचा महिमा भगवान् सांगतात–

नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः ।
श्वपचोऽपि नरः कर्तुं क्षमस्तावन्न किल्बिषम् ।
तावत्कर्तुं न शक्नोति पातकं पातकी जनः ॥ (पाठांतर)

नामांत पाप जाळण्याची जेवढी शक्ति आहे तेवढी शक्ति पाप करण्याची कोणांतच नाहीं. तसेंच कोणत्याही



मिषानें नांव घेतलें तरी तें घेणाराचा उद्धार होतो. तुलसीदास म्हणतात–

अजामिल एकबार । पुत्रहेत करि पुकार ।
ताको प्रभु तुरत तार । निगमन जस गाई ।।
मंगल मो रामनाम । दुसरा न कोई ।। १ ।।

नारायण नांवाचें–तेंही पुत्राच्या मिषानें–एकवार स्मरण केल्यामुळें अजामिळ उद्धरून गेला, हा केवळ नामाचा नैसर्गिक प्रताप होय. वामनपंडित म्हणतात–

न कळतां पद अग्निवरी पडे ।
न करि दाह असें न कधीं घडे ।।
अजितनाम वदो भलत्या मिषें ।
सकल पातक भस्म करीतसे ।।

मुख्य नांवाचा असा महिमा आहे. कल्पित नांवाचा नाहीं. तुकाराममहाराज म्हणतात–

नर अथवा नारी हो कां दुराचारी ।
मुखीं गातां हरी पवित्र तो ।।

ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

हरिमुखें म्हणा हरिमुखें म्हणा ।
पुण्याची गणना कोण करी ।।
रामकृष्णहरि उच्चार नामाचा ।
तेथें कळीकाळाचा रीघ नाहीं ।।



आणखी--

रामकृष्णनाम सर्व दोषां हरण ।
जडजीवां तारण हरि एक ॥

(हरिपाठ अभंग)

श्रद्धा असो वा नसो मुख्य नांवें मनुष्याला तारतात. तुकाराममहाराज म्हणतात--

असो नसो भाव आलों तुझिया ठाया ।
दृष्टि उघडुनी पाहे मजकडे पंढरीराया ॥

मागल्या (ईश्वरप्रणिधानाद्वा) या सूत्रांत 'प्रणिधानात्' याचा अर्थ 'भक्तिविशेषात्' असा आचार्यांनीं केला आहे. त्यांच्या मतानेंही असें ठरतें कीं, भक्तिपक्षांत ॐ प्रमाणें सर्वच मुख्य नांवें प्रणवाचीं वाचक आहेत, म्हणून सर्व नावांनीं ॐकाराप्रमाणेंच सिद्धि होते. भगवंताच्या ह्या नामस्मरणानें मनुष्य हा स्वत: पापनिवृत्ति करून घेऊन तरून जातो. परतु नुसतें नाम जपलें व श्रद्धा पातकाकडे ठेविली तर मात्र तें व्यर्थ होय.

इंद्रियांसि नेम नाहीं । मुखीं नाम करिल काई ॥

असें तुकाराममहाराजांचें वचन आहे.

शिष्य :-- महाराज, थोड्या वेळापूर्वी अजामिळाचें आपण उदाहरण दिलें व सांगितलें कीं कोणत्याही मिषानें श्रद्धा असो वा नसो नामाच्या योगानें तरणोपाय होतो. नाम घेणाराला 'पद्मपत्रमिवांभसा' म्हणजे कमलपत्राप्रमाणें



पातक शिवत नाहीं, असेंही वचन आहे, या विरोधाचा परिहार कसा ?

## ईश्वरश्रद्धेनेंच तरणोपाय

गुरु :- "असो नसो भाव आलों तुझिया ठाया ॥" असें तुकाराममहाराजांचें वचन आहे. भाव असो नसो देवा, तुझ्या पायापाशीं आलों असें तुकोबा म्हणतात ना? यावरून मनाची प्रवृत्ति देवाकडेच झाली कीं नाही ? तसेंच श्रद्धा असो वा नसो ईश्वराच्या नामस्मरणाकडे प्रवृत्ति राहिली तर तरणोपाय होणारच आहे

अजामिळानें पुत्राचे मिषानें नारायणाचें नांव घेतलें खरें पण केव्हां ? तर मरणसमयीं—म्हणजे इंद्रियांच्या सर्व प्रवृत्ति क्षीण होऊन नुसती वासनाच प्रबल राहते अशा वेळीं. ह्या वेळीं त्यानें नाम घेतलें तर त्याची प्रवृत्ति कोणीकडे असली पाहिजे हें तूंच सांग. वामनपंडित तर त्या वेळीं 'नारायणीं रंगली विप्रवाणी' अंतकाळीं नामस्मरणांत अजामिळाची वाणी रंगून गेली होती असें म्हणतात. ज्या जारिणी स्त्रियेशीं तो जन्मभर लंपट राहिला तिच्यांत त्याची वासना असती तर तिचेंच नांव त्यानें घेतलें असतें. यावरून नामावर श्रद्धा असो वा नसो नाम घेणारा मनुष्य तरून जातो असें सांगितलें असतां पापाकडे श्रद्धा ठेविली तरी चालेल असा त्यांतून अर्थ काढणें हा वेडेपणा आहे.

आतां, नाम घेतांना पद्मपत्राप्रमाणें पातक शिवत नाहीं हें जें म्हटलें आहे तें नामस्मरणामुळें जो विदेही झाला त्याच्या विषयीं म्हटलें आहे. कारण त्याची पापाकडली प्रवृत्ति केव्हांच नष्ट झालेली असते. परंतु पापपुण्य ज्यांना समजतें अशा साधकांविषयी तें म्हणणें नाहीं. पातकाचा स्पर्श होऊं न देणें हें नामस्मरणाचें फळ सांगितलें तें खरें आहे पण त्याचा अर्थ संतांसच माहित असतो. पाण्यांत कसें पोहतां येतें तें माशालाच पूर्णपणें माहित असतें.

पाण्यामध्यें मासा झोंप घेतो कैसा ।
जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ।।
तुका म्हणे संत असती ते कैसे ।
आपण व्हावें तैसे तेव्हां कळे ।। १ ।।

म्हणून साधकांनी त्या वचनाचा विपरीत अर्थ केला तर उपयोग होणार नाहीं. म्हणून साधकांनीं पातकांकडे प्रवृत्ति ठेवू नये. एकनाथमहाराज म्हणतात–

नाम स्मरतां म्हणूनी आचराल दोष ।
तरी श्रवणमननभक्ति पडेल ओस ।।

कारण मुद्दाम पातक करून नामस्मरण केलें तर तें व्यर्थ आहे. तुकाराममहाराजांचे असेंच वचन आहे–

जग रामनाम म्हणे । त्या कां न येती विमानें ।।
नष्ट गणिका राम म्हणे । तिसी वैकुंठीचें पेणें ।। १ ।।



शिष्य :— नामाच्या योगानें जर पातकें जळतात तर नाम घेणारा पातकें करीत राहिला तरी तीं नामानें जळणार नाहींत काय ?

गुरु :— नाम घेणारा पातकें करीतच राहील तर तीं नामानें जळतील, परंतु तें नामस्मरण प्रायश्चित्तार्थंच जातें. दुसरें, बापाच्या समक्ष जर पुत्र स्त्रीसंग करील तर बाप त्याला शिक्षा देईल, त्याप्रमाणें नाम घेऊन जो पातक करितो त्याचें पाप तर दूर होतेंच, पण नामाचा अपमान केल्यामुळें देवच त्याला नरकयातना भोगवितो. यम त्याला शिक्षा देत नाहीं. राजाचा मुलगा दुर्गुणी निघाला तर दुसरा कोणी त्याला शिक्षा देऊ शकत नाहीं. परंतु राजाच त्याला दंड करितो. यम ज्यांना शिक्षा करितो अशा लोकांना पश्चात्ताप होतच नाहीं. परंतु नांव घेऊन पाप केल्यामुळें परमेश्वराचा अपमान होतो म्हणून परमेश्वर जेव्हां अशा अपराध्यांस शिक्षा करितो तेव्हां त्यांना आपल्या अपराधाची आठवण राहते. अशा वेळीं त्यांना आपल्या कर्माचा पश्चात्ताप झाला तर त्यांची शिक्षा रद्द होते. परंतु यमाचे येथें पश्चात्ताप झाला तरी शिक्षा भोगावीच लागते.

स्मृतिकारानीं नामाचे दहा अपराध सांगितले आहेत ते असे—

सन्निदाऽसति नामवैभवकथा श्रीशेषयोर्भेदधी—



रश्रद्धा श्रुतिशास्त्रदेशिकगिरां नाम्न्यर्थवादभ्रमः ।
नामास्तीति निषिद्धकर्मविहितत्यागो हि धर्मांतरैः ।
साम्यं नाम्नि जपे शिवस्य च हरेर्नामापराधा दश ।।

आपल्याजवळ नाम आहे म्हणून सन्निंदा = संतांची निंदा करणें हा पहिला अपराध.

'असति नामवैभवकथा' म्हणजे दुष्टांना नाममहिमा सांगत बसणें हा दुसरा अपराध. दुष्टाला नाममहिमा कळला तर त्याला उलट दुष्टाचरण करण्याला जास्त उत्तेजन येईल. पहिले तो एक माणूस मारीत असला तर आतां दहा मारील. म्हणून दुष्टांना नाममहिमा सांगू नये.

तिसरा अपराध 'श्रीशेषयोर्भेदधीः' शिव आणि विष्णू यांच्यात भेद पाहणें. शिवालीलामृतांत यम आपल्या दूतांना सांगतात–

शिव थोर विष्णू लहान । हरि विशेष हर गौण ।
ऐसें म्हणति जे त्यांलागुन । आणून नरकीं घालावें ।।

(शि. अ. ११)

तुलसीरामायणांतही अशीं वचनें आहेत–

मम प्रिय शिवद्रोहि जे मम द्रोही शिवदास ।
ते नर करि है कलपभरी घोर नरकमें वास ।।
शिवद्वेषी मम दास कहावे ।
सो नर मोहे सपने नहि भावे ।।



माझ्या स्फुट प्रकरणांतही अशीं वचनें आहेत व विशेष स्फोट गीतासंगतींत केला आहे.

'अश्रद्धा श्रुतिशास्त्रदेशिकगिरां' म्हणजे वेद, शास्त्र आणि गुरु यांच्या वचनावर अविश्वास हे तीन अपराध असे सहा झाले.

सातवा अपराध 'नाम्न्यर्थवादभ्रमः' म्हणजे नामाच्या योगानें पापें जातात असें म्हणणें ही नामाची उगीच स्तुति आहे, हें म्हणणें खरें नाहीं, असें वाटणें.

" नामास्तीति निषिद्धकर्म "

म्हणजे आपल्या जवळ नाम आहेच, म्हणून निषिद्ध आचरण करणें, हा आठवा अपराध.

" विहितत्यागो " म्हणजे स्नानसंध्यादि विहित कर्मांचा त्याग करून नामच जपणें हा नववा अपराध.

आणि दहावा अपराध म्हणजे

" साम्यं नाम्नि जपे शिवस्य हरेः "

वेताळाचें नांव व हरिहरांचें नांव हें समसमान आहे असें वाटणें.

असे हे दहा अपराध सोडले पाहिजेत. हे अपराध घडले असतां यम जरी दड करूं शकला नाहीं, तरी परमात्मा त्याला शिक्षा देतो. राजा मुलास जसा स्वतः शिक्षा देतो, तसा परमात्मा नामापराध्यास विभूतिद्वारा शिक्षा न देतां स्वतः आपण शिक्षा देतो, म्हणून नामस्मरणांत



सदाचरण व सद्भक्ति हीं दोन्ही पाहिजेत. व पश्चात्तापयुक्त अंत:करणानें नाम घेतलें पाहिजे. विष्णुपुराणांत म्हटलें आहे कीं, पश्चात्तापानें नामस्मरण केलें असतां सर्व पाप जातें.

अस्तु. येथपर्यंत "तस्य वाचक: प्रणव:" या सूत्रानें नामस्मरण मंत्र वगैरे जपध्यानादि उपाय सांगितले. आतां त्या परमात्म्याचें ज्ञान होण्याकरितां जप व ध्यान कसें करावें त्याची रीति पुढल्या सूत्रांत सांगतील.

॥ श्रीमत्सद्‍गुरु ज्ञानेश्वरमहाराजकी जय ॥



**"तज्जपस्तदर्थभावनम्"** ॥ २८ ॥

गुरु :- मागल्या सूत्रांत ईश्वराचें नामस्मरण, मंत्र, वगैरे जपध्यानादि उपाय तुला सांगितले; आतां प्रणिधान म्हणजे भक्तीचे लक्षणाची रीति तुला सांगावयाची आहे. ते प्रणिधान सूत्रकार 'तज्जपस्तदर्थभावनम्' ह्या सूत्रानें सांगतात.

ॐकाराचा किंवा ईश्वराच्या रामकृष्ण नामाचा जप करणें व त्या नांवाचा अर्थ जो ईश्वर त्याची भावना करणें म्हणजे त्याची मूर्ति हृदयांत पुन: पुन: स्थापन करणें. ह्याचे योगानें साधकाला समाधि होतो. नांवाचा अर्थ म्हणजे ज्या व्यक्तीचें तें नांव असेल ती व्यक्ति, त्या नांवाचा अर्थ होय.



जप म्हणजे तोंडानें नामाचा उच्चार किंवा चिंतन करणें, आणि भावना म्हणजे परमेश्वरास पुनः पुनः ध्यानानें हृदयाचे ठिकाणीं स्थापन करणें, असें भोजवृत्तिकार व व्यास म्हणतात. गीतेंत म्हटलें आहे—

ॐइत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।। १३ ।।
(गीता· ८)

व्याहरन् म्हणजे उच्चारण. अनुस्मरन् म्हणजे भावनेनें ध्यान करून किंवा आठवण ठेवून. भगवान् म्हणतात ॐकाराचा जप करीत होत्साता माझें ध्यान करून जो देहाचा त्याग करितो तो परमगतीला जातो. आचार्य आपल्या भाष्यांत म्हणतात, यावज्जीवपर्यंत असेंच करीत राहावें. योगभ्रष्टाप्रमाणें भक्तही वायां जात नाहीं. "न मे भक्तः प्रणश्यति"

"शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते।"
(गीता अ. ६–४१)

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति।
न हि कल्याणकृत्कश्चिद् दुर्गतिं तात गच्छति
(गीता अ. ६ ४०)

हीं सगळी वचनें वरील म्हणण्याला प्रमाणभूत आहेत. कबीर म्हणतात—

संतबीज पलटे नहीं जो जाय जुग अनत ।।
ऊच नीच योनी + धरे अखिर संत का संत ।।



असो. याप्रमाणें वरील सूत्रांत जप व ध्यान हीं दोन्ही सांगतात. जपाला स्वाध्याय असें म्हटलें आहे.

स्वाध्यायाद्योगमासीत योगात् स्वाध्यायमामनेत् ।
स्वाध्याय योगसंपत्त्या परमात्मा प्रकाशते ।।

असें वचन विष्णुपुराणांत आहे. त्याचा अर्थ असा आहे कीं, जपाच्या योगानें ध्यान सिद्ध करावें, व ध्यानाच्या योगानें जप सिद्ध करावा, आणि ध्यान व जप यांच्या योगानें समाधि सिद्ध होतो व समाधीच्या योगानें परमेश्वराचें ज्ञान होतें. असें जपाचें महत्त्व आहे. म्हणूनच गीतेंत "यज्ञानां जपयज्ञोऽस्मि" असें देवानें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

समस्तांही यज्ञांच्या पैकीं । जपयज्ञ तो मी ये लोकीं ।।
जो कर्मत्यागें प्रणवादिकीं । निपजविजे ।।२३२।।
नाम जपयज्ञ तो परम । बाधू न शके स्नानादि कर्म ।।
नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थी ।।२३३।।

(ज्ञाने. अ. १०)

तुकाराममहाराज म्हणतात–

अविधि तो बाधी आणिकां अक्षरां। नाम निंदसुरा घेतां तरे।।

म्हणजे नामजपयज्ञाला अविधीचीही बाधा नाहीं-केव्हांही घेतले तरी तें पावन करीलेंच. यावज्जीव सर्वकाळ नामस्मरण करावें. वामनपंडित म्हणतात–



सदां येतां जातां उठत बसतां काम करितां ।
सदां देतां घेतां वदनिं वदतां ग्रास गिळितां ॥
निशाकाळीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं ।
समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करी ॥

एकनाथमहाराज म्हणतात—

हरि बोला देतां हरि बोला घेतां ।
सर्व कार्य करितां हरि बोला ॥ १ ॥
हरि बोला भांडतां हरि बोला कांडतां ॥
उठतां बैसतां हरि बोला ॥ २ ॥
हरि बोला एकांतीं हरि बोला लोकांतीं ॥
देह त्यागाअंतीं हरि बोला ॥ ३ ॥
हरि बोला जनीं हरि बोला विजनीं ॥
एका जनार्दनीं हरि बोला ॥ ४ ॥

तात्पर्य, नाम घेण्यास केव्हांही मोकळीक आहे. आपण स्नान केलें नसलें तर किंवा अशुचि असलों तर कर्माचा अधिकार नाहीं. परंतु नामस्मरण मात्र करितां येतें.

"कर्मधर्म नव्हती सांग ॥ उण्या आंगें पतन ॥ १ ॥
भलत्या काळें नामावळी ॥ सुलभ भोळी भाविकां ॥ २ ॥
प्रायश्चित्तें पडती पायां ॥ गाती तया वैष्णवां ॥ ३ ॥
तुका म्हणे नुपजे दोष ॥ करा घोष आनंदें ॥४॥

असें तुकाराममहाराजांनीं सांगून ठेवलें आहे. परंतु यावरून स्नानसंध्यादि विहित कर्माचा त्याग मात्र कोणीं



करूं नये. तो दशअपराधांपैकीं एक आहे हें मागें सांगितलेंच आहे. कारण जेवणाकरितां जर स्नान केलें पाहिजे तर नामस्मरणाकरितां कां करूं नये ?

**ॐकाराचा जप मात्र शुचिर्भुत होऊनच करावा भलत्या काळीं करूं नये.**

**अष्टांगयोग त्रिकांडात्मक**

यमनियमादि अष्टांगयोग हा तिन्ही कांडात्मक आहे असें वैदिक धर्मसूत्रांत सांगितलें आहे.

यम, नियम, आसन आणि प्राणायाम हे शारीरिक कर्मांत येतात. हा क्रियाविशेष भाग आहे.

प्रत्याहार, धारणा आणि ध्यान हे मानसिक कर्मांत येतात. हा उपासनेचा भाग झाला. यांत मन विषयांतून काढून चित्त एकाग्र करण्याचा अभ्यास होतो.

चित्त एकाग्र करून सारखें चिंतन करण्याचा अभ्यास अशा रीतीनें करावा. चिंतनाचे योगानें ध्याता आणि ध्येय एक झाले म्हणजे ज्ञान होतें-तोच समाधि. याप्रमाणें योग हा तिन्ही कांडात्मक आहे, हें वैदिक धर्मसूत्रांत दाखविलें आहे. नामजप करणाऱ्या जवळच नेहमीं परमात्मा राहतो. त्यांत विवेक मात्र त्याला साहय पाहिजे, हे मागें सांगितलेंच आहे. यालाच प्रणिधान म्हणजे भक्ति म्हणतात. स्वाध्याविषयीं ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–



तें द्विजासींच ब्रह्मसूत्र ।। येरां स्तोत्र कां नाममंत्र ।।
आवर्तणें पवित्र ।। पावावया तत्व ।। १०४ ।।

(ज्ञा. अ. १६)

ज्या स्तोत्रांत ब्रह्म प्रतिपादन केले तें ब्रह्मसूत्र होय. शंकराचार्य म्हणतात,

'ब्रह्मसूचकानि वाक्यानि संति अस्मिन् इति'

अशा ब्रह्मसूत्रांचें पठण फक्त द्विजांनींच करावें. इतरांनीं पौराणिक स्तोत्र किंवा नाममंत्र म्हणावे. शूद्रादिकांनाही नामाचा अधिकार आहे, असें तुकाराममहाराजांचें वचन आहे.

"येथें सकळांसि आहे अधिकार ।।
कलियुगीं उद्धार हरिनामीं ।।"

नाम घेणाऱ्याजवळ परमात्मा आवडीनें राहतो. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तयापाशी पांडवा । मी हारपला गिवसावा
जेथ नामघोष बरवा । करिती माझा ।। २०८।।

(ज्ञा. अ. ९)

तुकाराममहाराज म्हणतात -

निजलिया जागा उभा नारायण ।।
बैसल्या कीर्तन करितां डोले ।। १ ।।
उभा राहोनियां मुखीं नाम वदे ।।
नाचे नाना छंदें पांडुरंग ।। २ ।।



मार्गानें चालतां नाम वदे वाणी ।।
उभा चक्रपाणी मागें पुढें ।। ३ ।।
तुका म्हणे त्याला कीर्तनाची गोडी ।।
भावें घाली उडी नामासाठीं ।। ४ ।।

याप्रमाणें नाममहिमा वर्णन केला.

## भजनाचे प्रकार

नीलकंठ चतुर्धर भारताचे टीकाकार म्हणतात–

"भजनं द्विविधं भावनामयं प्रणिधानमयं च" म्हणजे भावनामय आणि प्रणिधानमय असें दोन प्रकारचें भजन आहे. भावनामय म्हणजे वेळोवेळीं नाम घेणें आणि मूर्ति मनांत आणणें आणि प्रणिधानमय म्हणजे एकांत एक मिळवीत जाणें. आतां एकांत एक मिळवीत जाणें कसें तें सांगतात–स्थूलाचा लय सूक्ष्मांत करावा आणि सूक्ष्माचा लय कारणांत करून अविद्येचा ब्रह्मांत लय करावा. ही वेदांतप्रक्रिया झाली.

आतां सांख्यप्रकिया– मन, देह, वगैरे ही प्रकृति, याचा लय पुरुषांत करावा. व पुरुषाचा म्हणजे जीवाचा लय ईश्वरांत करावा. याप्रमाणें ध्याता व ध्येय एक करून जीवब्रह्माचें ऐक्य झालें म्हणजे समाधि साधावा. गरुड-पुराणांतील मोक्षधर्म प्रकरणांतही असेंच सांगितलें आहे– प्रकृति, महत्तत्व, आणि अहंकार मिळून २५ तत्वें; त्यांना भोगणारा जीव आहे. जीवानें सव्वीसावा जो ईश्वर



त्यांत लीन होऊन मुक्त व्हावें. अगोदर जीवाला देहापासून निराळें काढिलें पाहिजे. वार्तिककार म्हणतात, प्रकृतिपासून जीवाला निराळें काढलें म्हणजे जडाचा अभिमान नष्ट होतो व जीवावरचा अभिमानही काढला म्हणजे जीव आणि परमात्मा एकच होतात. असें झालें म्हणजे आपण परमेश्वर-रूप होतो. या प्रणिधानाचेही दोन भेद आहेत. मी ईश्वराचा अंश आहें असें ध्यान करणें हें एक प्रणिधान व देव आणि मी एकच आहोंत असें वाटणें हें दुसरें प्रणिधान. पहिला प्रकार म्हणजे मी ईश्वराचा अंश आहें असें वाटणें ही उपासना होय. यांत मन कायम राहतें, परंतु ईश्वर आणि मी एकच आहों असें झालें म्हणजे तें ज्ञान होय. ही स्थिति मनाच्या पलीकडची आहे. हनुमन्नाटकांत तीन प्रकारचें प्रणिधान सांगितलें आहे,

देहबुद्ध्या तु दासोऽहं जीवबुद्ध्या त्वदंशक: ।
आत्मबुद्ध्या त्वमेवाहं इति मे निश्चला मति: ।।

मारुति म्हणतात, हे रामा, देहदृष्टीनें मी तुझा दास आहें. जीवदृष्टीनें तू समुद्र व मी तरंग म्हणजे तुझा अंश आहें व आत्मदृष्टीनें तूं पाणी आणि मी तरंग म्हणजे पाणीच. दोघेही एकच आहोंत. भावनामय भजनानें म्हणजे पुन्हां पुन्हां मूर्ति मनांत आणिल्यानें संप्रज्ञात समाधि होतो. व प्रणिधानमय भजनानें म्हणजे भावना दृढ झाल्यानें असंप्रज्ञात समाधि होतो. विज्ञानभिक्षु वार्तिककार म्हणतात,



आत्मा एक आहे अशी एक श्रुति सांगते व आत्मे पुष्कळ आहेत अशी दुसरी श्रुति सांगते. अशा दोन प्रकारच्या श्रुति आहेत, तरी दोन्ही श्रुतींत विरोध नाहीं. कारण व्यवहार दृष्टीनें आत्मे जरी अनेक भासतात तरी वास्तविक आत्मा एकच आहे. घटकाश व मठाकाश हे जसे उपाधिभेदानें भिन्न भासतात तसे आत्मे उपाधिभेदानें अनेक भासतात. परमार्थ-दृष्टीनें आत्मा एकच आहे. विज्ञानभिक्षु म्हणतात याचें जास्त विवेचन ब्रह्ममीमांसाभाष्यांत सांगू.

लोकांचें म्हणणें असें आहे कीं, जग सत्य आहे, व विज्ञानभिक्षुही असेंच म्हणतात. पण ह्याचा अर्थ इतकाच कीं, जग हें व्यवहारदृष्टीनें मात्र सत्य आहे. परमार्थदृष्टीनें जग सत्य नाहीं. सांख्यसारांत जड परमार्थदृष्टया असत्य आहे असें विज्ञानभिक्षूंनींच म्हटलें आहे.

शिष्य :– महाराज, भावनामय भजनानें संप्रज्ञात समाधि होतो व तोच भावना दृढ झाली म्हणजे प्रणिधान-मय भजनानें असंप्रज्ञात समाधि होतो असें आपण सांगितलें यावरून प्रणिधान निराकारांत होतें. साकारांत होत नाहीं असें झालें. तर मग सगुणभक्ति गौण झाली नाहीं काय ?

गुरु :– सगुणभक्ति मुळींच गौण होत नाहीं. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, सगुणभक्ति निराळी नाहीं. निरा-कारांत लय करून प्रणिधान सिद्ध होतें, तसेंच साकारांतही लय करून प्रणिधान सिद्ध होतें. अशा प्रकारची एक प्रक्रिया



भागवताच्या एकादशस्कंधांत सांगितली आहे. ती अशी- आपल्या हृदयांत हरीचें ध्यान आणून त्याच्या हास्यमुखाचें पुष्कळ वेळ ध्यान करीत राहावें, नंतर नुसते हास्यमुखाचेंच ध्यान करावें, व त्यानंतर नुसत्या हास्याचेंच ध्यान करीत करीत त्या आनंदांत आपण मिळून जावें. गीतेंत निर्गुणयोग्यांपेक्षां सगुणयोग्यालाच श्रेष्ठ म्हटलें आहे. कारण देव म्हणतात, त्यांचा उद्धार करणारा मीच आहें. परंतु निर्गुणयोगी मात्र शीण पावतात.

क्लेशोधिकरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ॥५॥

(गीता अ. १२)

ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-

पैं जे वानी श्यातुका । तेचि वेगळिये वाला एका ॥
तैसा एकदेशीया व्यापका । सरिसा पाडू ॥ २५ ॥

( ज्ञाने. अ. १२)

जो कस तोळाभर सोन्याला लागतो तोच वालभराला-हि लागणार. तसा एकदेशी आणि व्यापक किंवा सगुण आणि निर्गुण परमात्मा हे एकच होत. व्यापक ब्रह्माचें ध्यान केल्यानें पूर्णता व समाधि होतो तसेंच साकाराच्या ध्यानानेंहि होतें. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-

आपुलिया साटोवाटी । शून्य घेती उठाउठी ॥
तेही मातेंची किरिटी । पावती गा ॥ ५८ ॥

परंतु वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे ।



ऐसें नाहीं आगळे । कष्टचि तया ।। ५९ ।।

आतां सगुणभक्तांविषयीं सांगतात-

म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा ।।
जे कां भक्तिपंथा । वोठंगले ।। ७५ ।।
ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर ।।
ध्यानमिषें घर । माझें झाले ।। ८० ।।
जयांचिये आवडी । केली मजशीं कुळवाडी ।।
भोगमोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ।। ८१ ।।
ऐसे अनन्य योगें । विकले जीवें मनें आंगें ।।
तयांचें कायि एक सांगें । जे सर्व मी करीं ।। ८२ ।।

आतां अर्जुनाला उपदेश करितात-

म्हणूनी प्रवृत्ति आणि निवृत्ति । इये वोझीं नेघे मती ।।
अखंड चित्तवृत्ति । माझ्या ठायीं ।।८१।।
आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे ।।
निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायीं ।। १२३ ।।
ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना ।।
तू सायुज्यसदना । माझिया येसी ।। १२४ ।।

आणखी-

अभ्यासाहुनी गहन । पार्था मग ज्ञान ।।
ज्ञानापासूनी ध्यान । विशेषिजे ।। १४१ ।।
मग कर्मफलत्याग । तो ध्यानापासूनि चांग ।।
त्यागाहूनि भोग । शांतिसुखाचा ।। १४२ ।।



ऐसिया यया वाटा । इहींचि पेणीं सुभटा ।।
शांतीचा माजिवटा । ठाकिला जेणें ।। १४३ ।।

(ज्ञा. अ. १२)

यावरून सगुणभक्ति गौण नाहीं हें तुला समजलेंच असेल. दुसरें निर्गुणाची कांहीं भावना होत नाहीं, त्यांत नुसतें प्रणिधानच होतें; परंतु सगुणभक्तींत दोन्ही होतात, म्हणून सगुणभक्तांना निर्गुण आपोआपच प्राप्त होतें. जसें उष्णताच नुसती घेणारांस विस्तव घ्यावा लागतो, पण विस्तव घेतला तर दोन्ही मिळतात. श्रीधरांनीं हरिविजयांत असें एक उदाहरण दिलें आहे. सुगंध हा निर्गुण व कस्तुरी सगुण. नुसता सुगंध मिळण्यापेक्षां कस्तुरी मिळाली तर कस्तुरी मिळून त्याबरोबर सुगंध सहजच मिळतो. यावरून हें सिद्ध होतें कीं, निर्गुण सांपडला आणि सगुण प्राप्त झालें नाहीं तर नुसत्या निर्गुणानें भ्रम जात नाहीं. याला उदाहरण हरणाचेंच. हरणाला कस्तुरीचा वास येत असतो, परंतु ती आपल्याजवळ बेंबींतच आहे हें न कळल्यामुळें तो भटकत फिरतो. त्याप्रमाणें निर्गुणाच्या ध्यानानें लोक कष्टी होतात, परंतु ज्यानें सगुण परमात्मा पाहिला त्याला निर्गुणाची आपोआपच प्राप्ति होते.

सगुणनिर्गुण दोन्हीं ज्याचीं अंगें ।
तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ।।

हें तुकाराममहाराजांचें वचन मागें आलेंच आहे.



याप्रमाणें प्रणिधान–भक्ति–सिद्ध झाली. या प्रणिधानावर पुष्कळ श्लोक दिले आहेत. त्यांचा अर्थ ईश्वरप्रकरणाच्या शेवटीं सांगूं.

**प्रणिधान ज्ञान होईपर्यंत**

आतां हें प्रणिधान ज्ञान होईपर्यंत असतें. परंतु ज्ञान झाल्या नंतर अखंड भक्तिच असते. ज्ञानानंतर भक्ति कशी असते त्याचें वर्णन स्वमंतव्यांशसिद्धांततुषार, भक्तिपद-तीर्थामृत, भगवद्गीतासंगति ह्या स्वकृत ग्रंथांत पहा. ह्याचें निरूपण मधुसूदनसरस्वती ह्यांनींही भक्तिरसायनांत केलें आहे. गीतेंत भगवान् म्हणतात–

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥५४॥
(गीता अ. १८)

म्हणजे ज्ञानानंतर तें प्रणिधान अकृत्रिम भक्ति बनतें. ज्ञानेश्वरमहाराजांनींही ज्ञान झाल्यानंतर अकृत्रिम भक्ति कशी राहते हें अमृतानुभवांत सांगितलें आहे. ते म्हणतात–

देव देऊळ परिवारू । कीजे कोरूनि डोंगरू ।
तैसा भक्तीचा व्यवहारू । कां न व्हावा ॥
कोणी एक अकृत्रिम । भक्तीचें हें वर्म ।
योग ज्ञानादि विश्राम । भूमिका हे ॥(प्र.९)

ज्ञानेश्वरींत असेंच म्हटलें आहे–



तैसी क्रिया कीर न साहे .
परी अद्वैतीं भक्ति आहे ।।
हें अनुभवाचि जोगें नोहे ।
बोला ऐसें ।। ११५१ ।।

(ज्ञा. अ. १८)

भागवतांत म्हटलें आहे–

आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे ।
कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ।।१०।।

(भा. स्कं. १-७)

त्या हरीचे गुणच असे आहेत कीं, ज्ञान झाल्यावरही सत्पुरुष त्या परमेश्वराचेच ठिकाणीं निर्हेतुक भक्ति करीत राहतात. वरील श्लोकाचा भावार्थ वामनपंडित सांगतात–

आत्माराम असे शुकादिक मुनी ज्यांचे अविद्यामय ।
ग्रंथी सर्वहि सूटल्या जितचि जे मुक्त स्वयें अद्वय ।
भक्ति श्रीपतिची उगीच करिती तीही निमित्ताविण ।
कीं मुक्तीहुनि गोड फार असती श्रीमाधवाचे गुण ।।

भक्तीचें पहिलें स्वरूप म्हणजे भावना-तीच ज्ञान होईपर्यंत प्रणिधान या रूपांत असते–व ज्ञान झाल्यावर तीच अकृत्रिम भक्ति बनते. तिलाच पराभक्ति म्हणतात. भक्ती हीच सर्वांत श्रेष्ठ ठरते. कारण भक्तांना अगदीं बालंबाल खात्री असते कीं, पशु, वृक्ष, पाषाणादि यांपैकीं कोणत्याही योनींत आपण गेलों तरी तेथें भक्ति हो राहतेच



परंतु इतर साधनें फक्त मनुष्ययोनींतच आहेत. तीं इतर योनींत राहतील किंवा नाहीं याची शंका आहे. विष्णु-पुराणांत प्रल्हादानें देवाला हेंच मागणें मागितलें आहे.

नाथ योनिसहस्त्रेषु येषु येषु व्रजाम्यहम् ।।

तेषु तेष्वचला भक्तिरच्युतास्तु सदा त्वयि ।।१८।।

(अंश १-२०)

प्रल्हाद म्हणतो–हे नाथ, तूं आमच्यावर कृपा करणारा आहेस. मला एवढेंच दे कीं, अनंत योनींत जरी मी फिरलों तरी, तुझ्या ठिकाणीं माझी अचल भक्ति असावी. या श्लोकांत सहस्त्र शब्द अनंतवाची आहे. 'शतमनंतं भवति' अशी श्रुति आहे. पुरुषसूक्तभाष्यांतही सहस्त्रशब्द अनंतवाची सांगितला आहे. असो. ईश्वरप्रणि-धानानें आपोआपच चित्त एकाग्र होतें. वास्तविक पशुयोनींत चित्त विक्षिप्त असल्यामुळें तें एकाग्र होण्याचा संभवही नाहीं, परंतु भक्तीनें पशूंचेंही चित्त एकाग्र झाल्याचें उदाहरण आहे. जसें गजेंद्राला भक्तीनेंच चित्त एकाग्र होऊन योगसिद्धि झाली. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

म्हणोनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें ।।
वरी देहाचेनि नांवें । पशूंचेंही लाभो ।।४४१।।

पाहे पां सावजें हातिरुं धरिलें ।
तेणें तया काकुळती मातें स्मरिलें ।।



कीं तयाचें पशुत्व वावो जाह्लें ।
पावलिया मातें ॥४४२॥
(ज्ञा. अ. ९)

याप्रमाणें ईश्वरप्रणिधानानें योगसिद्धि होते, हें तर सिद्ध झालेंच, पण इतर उपायानें जी योगसिद्धि होते त्यांत फार विघ्नें येतात, व तीं विघ्नें दूर करण्याला अतिशय कष्ट पडतात; तशीं विघ्नें ईश्वरप्रणिधानांत परमात्मा भक्तांना येऊं न देतां-

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ॥१२॥
(गीता अ. ७)

हें आपलें वचन तो कसें खरें करून दाखवितो तें पुढल्या सूत्रांत सांगेन.

(ता. २३-१०-०७)

॥ श्रीमत् सद्‌गुरुज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥



**ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यंतरायाभावश्च ॥ २९ ॥**

गुरु :- योगशास्त्रांतील समाधिपादांत ईश्वरप्रकरण हें महत्वाचें आहे. व त्या ईश्वरप्रकरणाचें आजचें हें शेवटलें सूत्र आहे. "ईश्वरप्रणिधानाद्वा" या सूत्रापासून ईश्वरप्रकरणास प्रारंभ होऊन आजपर्यंत जीं एकंदर ६ सूत्रें

